


नोंदणी क्र. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

वर्ष १९ वे ] ऑक्टोबर १९६५ [ अंक १



वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किरकोळ अंक १ रु.








प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचे मासिक

वर्ष एकोणिसावे

अंक पहिला

# नवभारत

ऑक्टोबर

१९६५

( महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृति मंडळ पुरस्कृत )

संपादक-मंडळ

प्रा. वि. म. बेडेकर—प्रा. गोवर्धन पारीख का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हे मासिक श्री. म. शं. साठे यांनी दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथे छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनी प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक,
'गणेश भुवन' २७६, तेलंग रोड, माटुंगा–मुंबई १९

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक,
C/o प्राज्ञ प्रेस, वाई ( जि० सातारा )

३ चौकशी : श्री. वा. वि. कोनकर
१८८ एफ्, भीमराववाडी, मुंबई २
फोन नं. २३५५४

# प्राज्ञपाठशाळामंडळ ग्रंथमाला

| | | | | |
|---|---|---|---|---|
| (१) धर्मकोश– व्यवहारकाण्ड | भाग | १ | ते ३ | किंमत |
| साधी बांधणी ... | ... | | ... | ८०·०० |
| कापडी बांधणी ... | ... | | ... | १०४·०० |
| (२) धर्मकोश – उपनिषत्काण्ड | भाग | १ | ते ४ | |
| साधी बांधणी ... | ... | | ... | १५०·०० |
| कापडी बांधणी ... | ... | | ... | १८२·०० |
| (३) धर्मकोश– संस्कारकाण्ड | भाग १ ला | | .... | ४५·०० |
| कापडी बांधणी ... | .... | | ... | ६३·०० |
| (४) मीमांसादर्शन ... ... | ... | | ... | ३०·०० |
| (५) मीमांसाकोश ... | भाग | १ | ते ६ | २३०·०० |
| (६) कौषीतकिब्राह्मणारण्यकविषयकोश | ... | | ... | ६·०० |
| (७) बौद्धागमार्थसंग्रहः .... | ... | | ... | २०·०० |
| (८) हिंदुधर्माची समीक्षा ( लक्ष्मणशास्त्री जोशी ) | | | ... | ५·०० |
| (९) वैदिक संस्कृतीचा विकास ... | .. | | ... | ६·०० |
| (१०) नवमानवतावाद ... | ... | | ... | २·५० |
| (११) मानवाचा आदर्श ... ... | ... | | ... | ३·०० |
| (१२) चार्वाक – इतिहास आणि तत्त्वज्ञान ( प्रा. सदाशिव आठवले ) | | | ... | ३·०० |
| (१३) गीता-प्रवेश ( डॉ. गो. वि. देवस्थळी ) | | | ... | २·५० |
| (१४) महाराष्ट्रांतील दुष्काळ व त्यावरील उपाययोजना ( श्री. चा. अ. दाभोलकर ) | | | .... | २·०० |



अनुक्रमणिका

श्री तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

## मानव्याचा सेवक व मानवी संस्कृतीचा तत्त्वज्ञ–

# डॉ. अल्बर्ट श्वाइटझर

विषुववृत्तावरील ऑफ्रिकेच्या जंगलात रानटी निग्रोंची गेली ५२ वर्षे सेवा करण्यात ज्याने जन्म घालविला तो जर्मन तत्त्वज्ञ डॉ. अल्बर्ट श्वाइटझर वयाच्या ९० व्या वर्षी गेल्या सप्टेंबरच्या ५ तारखेस आफ्रिकेतील स्वतःच्या रुग्णालयात खिस्तवासी झाला. १४ जानेवारी– १८७५ साली अल्सेस प्रांतातील केसरबर्ग येथे श्वाइटझरचा जन्म झाला. त्याला १९५२ साली शांततेचे नोबेल पारितोषिक मिळाले. तत्त्वज्ञान, धर्मविद्या, संगीत आणि वैद्यक या विषयात तो पारंगत होता एवढेच नव्हे तर या चारही विषयात त्याने सशोधन करून नव्या उन्नत कल्पनांची व विचारांची भर घातली. " भारतीय विचारसरणी व तिचा विकास " या नावाचा भारतीय तत्त्वज्ञानाची समीक्षा करणारा त्याचा प्रबंध विश्वसंस्कृतीच्या तत्त्वसमीक्षेत भर घालणारा आहे. प्राचीन वैदिक कालापासून तो विवेकानंद, महात्मा गांधी, रवींद्रनाथ ठाकूर यांच्यापर्यंतच्या तत्त्वज्ञानाच्या विचारसरणीचे मंथन व मूल्यमापन या प्रबंधात केले आहे. पश्चिमी संगीतज्ञ जोहान सेबॅस्टिअन बाख ( Bach ) याचे जीवनचरित्र व त्याची वादनकला या विषयावर फ्रेंच भाषेत प्रथम ग्रंथ लिहिला व त्यामध्ये भर घातलेली याची नवी आवृत्ति जर्मन भाषेत त्याने लिहून नंतर प्रसिद्ध केली. हा ग्रंथ इतर अनेक युरोपियन भाषांमध्ये भाषांतरित झालेला आहे. जर्मन महाकवी गटे ( Goethe ) याच्या संबंधी श्वाइटझरचा " पाच अध्ययने " हा निबंध फार महत्त्वाचा मानला जातो. गटेच्या जीवनाचा श्वाइटझरच्या जीवनावर मोठा प्रभाव पडला होता असे या निबंधावरून दिसून येते. श्वाइटझरने लिहिलेल्या ग्रंथांची संपत्ति मोठी आहे. परंतु त्या सर्व संपत्तीमध्ये त्याचे मानवी संस्कृतीचे मनन, चिरंतन मूल्याचे आहे. मानवी संस्कृतीचा समतोल बिघडला असून तिचा ऱ्हास होत आहे. त्या ऱ्हासापासून तिचा बचाव करण्याकरता मानवी संस्कृतीचे पुनरुज्जीवन ज्या तत्त्वांच्या आधारे केले पाहिजे त्यांचे समालोचन त्याने आपल्या संस्कृतिविषयक दोन प्रबंधांमध्ये अधिक विस्ताराने केले आहे. मानवी संस्कृति पतन पावत आहे, अशी भयाविष्ट भावना त्याच्या ठिकाणी व अनेक पश्चिमी तत्त्वचिंतकांच्या ठायी निर्माण होण्याचे एक प्रधान कारण पहिले जागतिक महायुद्ध होय.

डॉ. अल्बर्ट श्वाइटझर याने देवविद्या, तत्त्वज्ञान, संगीत व वैद्यक या चारही विद्यांमध्ये परिणतप्रज्ञ म्हणून जरी ख्याति मिळविली होती तरी ही त्याची कामगिरी फावल्या वेळातील होती. त्याच्या व्यक्तिमत्त्वाचा अलौकिक महिमा म्हणजे दुःखित व पतित मानव्याची सेवा करण्याकरिता समर्पित केलेले त्याचे जीवन होय. पश्चिम युरोपातील उच्च संस्कृतीत वाढलेला, प्रतिभाशाली म्हणून विद्यापीठामध्ये मान्यता पावलेला हा माणूस वैभव, सुख आणि मान यांचा त्याग करून विषुववृत्तावरील मध्य आफ्रिकेतील ओगोवे नदीच्या तीरावर लॅम्बरीनी येथे रुग्णालय बांधून रानटी, गलिच्छ व महारोगपीडित माणसांची सेवा करण्यात धन्यता मानतो. पतन पावत असलेल्या व विनाशाकडे धावणाऱ्या मानवी संस्कृतीला वाचविण्याकरिता व कर्तव्यकर्माची दिशा दाखविणारा आदेश म्हणजेच हे डॉ. श्वाइटझरचे जीवन होय. मानवाचे व्यक्तिमत्त्व व शील त्याच्या वर्तनातून निर्माण होते; त्याच्या प्रयत्नातील विविध अनुभव हे स्वभाव व शील घडवीत असतात; हा श्वाइटझरचा सिद्धान्त त्याच्या स्वतःच्या जीवनपद्धतीत प्रकट झाला आहे.

" प्राचीन अरण्याच्या परिसरात " या ४५ वर्षांपूर्वी प्रथम साडेचार वर्षे घालविल्यानंतर लिहिलेल्या आपल्या आफ्रिकेतील अनुभवाच्या कथेच्या प्रारंभी श्वाइटझर म्हणतो– " मध्य आफ्रिकेत रुग्णालय स्थापन करून वैद्यकीय सेवा करण्याकरिता मी ट्रॉसबर्ग विद्यापीठातील प्राध्यापकपद, साहित्यलेखन आणि वादनव्यवसाय वय वर्षे ३० च्या सुमारास सोडून दिला, हे








कसे घडले ? त्या आफ्रिकेतल्या जुनाट जंगलामधील मूळच्या रहिवाशी जमाती भयंकर शारीरिक व्याधींनी ग्रासलेल्या असतात, असे मी वाचलेले होते. तेथे जाऊन आलेल्या खिस्ती धर्मोपदेशकांकडूनही या माहितीस दुजोरा मिळत होता. आम्ही युरोपियन लोक त्या दूरच्या प्रदेशावर अनेक शतके वर्चस्व गाजवीत आहोत; तेथील मानवांना राबवून वैभव संपादन करीत आहोत. आम्ही स्वतःला खिस्ताचे अनुयायी समजतो. आफ्रिका खंडात आम्ही प्रवेश करून त्यावर आमची अधिसत्ता स्थापन केली. तेथील काळ्या लोकांशी आम्हा गोऱ्या लोकांचे कशाप्रकारचे वर्तन आहे ? त्या जमाती नष्ट झाल्या, नष्ट होत आहेत व काही मरणोन्मुख झाल्या आहेत. सर्व काळ्या लोकांची खच्ची होत आहे. आणि हे कशाने घडत आहे तर आम्ही त्या खंडात प्रवेश केला म्हणून. या साध्या गोष्टीचा काय अर्थ ? युरोपियन लोक अन्याय व क्रूर कर्मे शतकानुशतके करीत आले आहेत याची करुणकथा कोण सांगू शकेल ? आम्ही खिस्ताच्या अनुयायांनी जळती पेये व मृत्युपंथाला नेणारे भयंकर रोग त्यांना दिले व त्यापासून त्यांची जी दुर्दशा झाली याचे मोजमाप कोणी काढू शकेल काय ? गोरे मानववंश व काळे मानववंश यांचा संबंध घडून आल्यापासून आतापर्यंत जे जे काही घडले त्याची कथा जर तपशीलवार लिहिली गेली तर ती कथा आमच्यापैकी कोणीही न वाचता मिटवून ठेवील इतकी ती हृदयविदारक व भयानक कथा आहे ".

" आपण व आपली संस्कृति यांच्यावर मोठ्या ऋणाचा भार आहे. या लोकांवर आपण उपकार करावयाचे की नाही यासंबंधी आपणास स्वातंत्र्य मुळीच नाही; ते आपले कर्तव्य आहे. त्यात आपले औदार्य नसून ते एक कृतकर्माचे प्रायश्चित्त आहे. आपण आपल्या शक्तीप्रमाणे जी काही सेवा करू तेवढ्याने हे प्रायश्चित्त पुरे होणारे नाही. आपण केलेल्या महापातकाची निष्कृति सहस्रांशानेही होणार नाही. येथील दुःखनिवारणाकरिता जे काही करावयाचे त्याचा ही जाणीव पाया होय. "

" गेल्या ४॥ वर्षांच्या ( इ. स. १९१३–१८ ) अनुभवाचे सार कसे सांगावे ? विद्या आणि कला यांच्या जगामधून मी या प्राचीन जंगलाकडे ज्या विचारांनी ओढलो गेलो ते विचार या अनुभवाने खरे ठरले. माझे मित्र पूर्वी मला तिकडे जाऊ नकोस असे सांगताना असे म्हणाले की निसर्गाच्या उत्संगावर जगणारे ते लोक आपल्याइतके व्यथित नाहीत व त्यापासून इतक्या दुःखाची जाणीवही त्यांना होत नाही. परंतु मला अशी खात्री झाली आहे की ते त्यांचे म्हणणे खरे नव्हते. आपणास युरोपमध्ये माहीत असलेले सगळे रोग येथ पसरले आहेत. ते भयंकर रोग येथे आपण आणले आहेत. त्या रोगांच्या वेदना आपणापेक्षा येथे अधिक दुरवस्था निर्माण करीत आहेत. हे निसर्गाचे बालक माणसासारखे माणूस आहे. त्यामुळे भयंकर यातना या बालकाला अधिक भेडसावीत आहेत. शारीरिक दुःखांनी येथे सगळीकडे छळ मांडला आहे. आपली वृत्तपत्रे याची उपेक्षा करून मौन धारण करतात. आपण तिकडे कानाडोळा करतो. हे न्याय्य आहे काय? आपण सुसंस्कृत लोक खरे बिघडलेले आहोत. आपल्यापैकी कोणी जर आजारी पडले तर डॉक्टर लगेच धावत येतो. शस्त्रक्रियेची आवश्यकता दिसली तर रुग्णालयाचे द्वार त्वरित उघडले जाते. उलट इकडे लाखो आणि करोडो लोक असहाय व निराश होऊन निपचीत पडलेले असतात. वैद्यक विज्ञानाच्या योगाने ज्या भयंकर यातना सहज दूर होऊ शकतात त्या येथील हजारो माणसांना प्रतिदिन सहन केल्याशिवाय इलाज नसतो. प्रतिदिनी जी निराशा दूरच्या अंतरावरील या झोपड्यांना वेढून बसली आहे. ती आपण सहज संपुष्टात आणू शकू. आपल्यापैकी कोणीही १० वर्षे कोणतीही वैद्यकीय मदत मिळाली नाही अशा कुटुंबातील आहोत अशी कल्पना तरी करू शकतो काय ? आपली ही डोळ्यावरील झापड नष्ट करून आपल्यावरील ही जबाबदारी पार पाडण्यास उद्युक्त व्हावयास पाहिजे. "

" काळ्या आजारी लोकांची सेवा करण्यात आयुष्य झिजविणे हे माझ्या जीवनाचे इतिकर्तव्य होय. हे केवळ सत्कर्म नव्हे. जे टाळणे अयोग्य व अशक्य आहे असे हे मुख्य कर्तव्य आहे. खिस्त आणि धर्म ज्या करुणेला आवाहन देतात, आपल्या मूलभूत कल्पना व तर्कशास्त्रे ज्या करुणेचे समर्थन करतात ती करुणा आपल्या ठिकाणी जागृत व्हावी असे मी इच्छितो. "

"४॥ वर्षे ओगोवे नदीच्या काठी असलेल्या लँबरिनी या खेडेगावात मी काम केले. याठिकाणी पावसाळ्यामध्ये फार उकाडा होतो. विषुववृत्तावरील जास्तीत जास्त उन्हाळ्याचे हे ठिकाण आहे. उन्हाळ्यामध्ये आम्ही समुद्रकिनाऱ्यावर काही महिने काढतो. ओगोवे नदीच्या मुखाशी केप लोपेजपासून दोन तासाच्या अंतरावर इमारती लाकडाचा व्यापार करणाऱ्या गोऱ्या माणसाचे एक घर होते. ते त्याने आम्हाला विनामूल्य राहावयास दिले. त्याचे हे औदार्य आम्ही कधीही विसरणार नाही. आमचे तेथे मुख्य अन्न म्हणजे समुद्रात पकडलेले मासे. येथे हेरिंग मासे अतोनात मिळतात. यावेळी लाकडाचा व्यापार मंदावून स्थगित झाला होता. या घराच्या भोवताली या गोऱ्या माणसाच्या कामगारांच्या झोपड्या होत्या. त्या आता मोडकळीस आल्या आहेत. वाटेने जाणारे येणारे निग्रो वाटसरू येथे विश्रांती व झोप घेत असत. मी येथे राहायला आल्यावर त्या दिवशी तेथे कोणी राहते की काय हे समजण्याकरिता मोठ्याने हाका मारू लागलो. कोणीही साद दिली नाही. सगळीकडे सामसूम दिसली. सहज एका झोपडीत शिरलो, एक मनुष्य जमिनीवर पडलेला, त्याचे डोके वाळूत अर्धवट रुतलेले व त्याच्या अंगावर मुंग्या तरतरत चाललेल्या होत्या. तो निद्रा-रोगाने पछाडलेला होता त्यामुळे त्याच्या सोबत्याना त्याला बरोबर नेणे अशक्य झाल्यामुळे ते तेथेच सोडून गेले असावे. त्याचा श्वास चालू होता. त्या असहाय स्थितीतल्या माणसाला मी तपासू लागलो. झोपडीच्या दारातून बाहेरचेही दृश्य मला दिसत होते. हिरव्या निळ्या प्रचंड वनश्रीच्या परिसरात लांबवर पसरलेल्या उपसागराचे चमकदार निळे पाणी आणि त्या पाण्यावर मावळत्या सूर्याच्या सोनेरी किरणांचा पूर पसरेलला होता. निसर्गसौंदर्याच्या जादूने भारलेले, नयनात भरणारे ते नंदनवन आणि त्या नंदनवनातील निराधार व निराश असा दुर्दशेत सापडलेला माणूस. या दोन्ही गोष्टी एकाच दृष्टिक्षेपात समावलेल्या होत्या. या दृश्याने मी भारावून गेलो. ही स्थिती म्हणजेच आफ्रिका होय. हेच आफ्रिकेचे प्रतीक ! !"

डॉ. अल्बर्ट श्वाइटझर याने रामदासस्वामींच्या शब्दात सांगावयाचे म्हणजे तारुण्यकाळीच अरण्यवास पतकरला. परंतु हा अरण्यवास रामदासस्वामींच्या जीवनाच्या भारतीय तत्त्वज्ञानाच्या आदर्शानुसार नव्हता. सर्व संकल्प विकल्पांचा निरास करून ऐहिक जीवनाचे व विश्वाचे मिथ्यात्व अंगी बाणवून निर्गुण व शाश्वत चैतन्यामध्ये निर्विकल्प समाधि लावून बसण्याकरिता नव्हता. हा अरण्यवास ऐहिक जग व जीवन हे सत्य असून जग व जीवन बदलण्याकरिता, सुधारण्याकरिता व मंगलमय बनविण्याकरिता भगीरथ प्रयत्न करणे हा त्याचा उद्देश होता. ही भारतीय अध्यात्मवादाशी सुसंगत नसलेली आणि येशू खिस्ताच्या जीवनातून मिळालेली प्रेरणा होती. करुणामय परमात्मा हेच नैतिक जीवनाच्या प्रामाण्याने सिद्ध होणारे पारमार्थिक सत्य आहे. या सत्यावरील श्रद्धा हा ज्याचा गाभा आहे तो मानवी समाजातील उच्चतम धर्म होय. असा उच्चतम धर्म जगात एकच आहे. तो म्हणजे खिस्ताचा धर्म होय. सुमारे गेली दोनहजार वर्षे ज्याचा इतिहास घडत आहे तो खिश्चन धर्म म्हणजे हा धर्म नव्हे. ऐतिहासिक खिश्चन धर्मात अनेक दोष आहेत. जगातील सर्वच धर्मात कमीअधिक प्रमाणात तसे दोष आहेत. म्हणून असे म्हणता येते की जगातील धर्म हे दुबळे आहेत. कारण धर्म दुबळा असल्यामुळे युद्धसंस्था हजारो वर्षे प्रबळ राहिली आहे. परंपरागत खिश्चन धर्म किंवा जगातील इतर सर्व धर्म करुणामय ईश्वरी सत्यापासून दुरावलेले आहेत. असा धर्मविषयक विचार डॉ. अल्बर्ट श्वाइटझर याने धर्ममीमांसेत व संस्कृतीमीमांसेत प्रामुख्याने मांडला आहे. प्रेमस्वरूप ईश्वराचे सान्निध्य आणि तादात्म्य दुःखित जीवांच्या सेवेतच आणि मानवी जीवनाच्या भौतिक व आध्यात्मिक सुधारणेतच अनुभविता येते. जो वैद्य क्लोरोफॉर्मसारखे औषध वापरून रोगपरिहारक सुरी चालवितो, आणि जीवाला दुःखमुक्त करतो तो मोक्ष आणि ईश्वरी राज्य यांचा भागीदार होतो असा एक धर्मसिद्धान्त डॉ. श्वाइटझर याने मांडला व आचरणात आणला.

## मानवी संस्कृतीचे तत्त्वज्ञान

विद्यमान मानवी संस्कृतीची मीमांसा ही डॉ. श्वाइटझरची मौलिक देणगी होय. मानव समाजाचे या विश्वातील व्यवहार हे त्यांच्या विचारविश्वाचे निदर्शक असतात, म्हणून विचारविश्व तपासत असताना विश्वातील व्यवहारही तपासले पाहिजेत, असे सांगून

तो म्हणतो-विश्वविचाराचा प्रभाव मानव जसे राहतात व जसे वर्ततात त्यावर पडलेला असतो. या विचार-विश्वाच्या जीवनदृष्टी व विश्वदृष्टी अशा दोन बाजू असतात. अनेक तत्त्ववेत्ते विश्वाची तात्त्विक मीमांसा सांगून त्याच्या आधारावर आपल्या जीवनदृष्टीची मीमांसा करतात. वस्तुतः या मीमांसेचा क्रम उलट्या असावयास पाहिजे. जीवनदृष्टि व विश्वदृष्टि यामध्ये जीवनदृष्टि ही प्रधान होय, आणि विश्वदृष्टि हे तिचे कार्य होय. जीवनार्थ प्रेरणा ( Will-to-live ) हीच जीवनदृष्टि व विश्वदृष्टि यांचे मूळ होय. सर्व प्रकारचे ज्ञान जीवनार्थ प्रेरणेचेच आविष्कार होत. आजपर्यंत पाश्चात्त्य व भारतीय हे दोन्ही या मूलभूत प्रेरणेच्या व सत्याचा महिमा लक्षात न घेता जीवनदर्शन व विश्व-दर्शन यांची रचना करीत राहिले आहेत. विश्वज्ञान जीवनदृष्टीचा अभिप्राय निश्चित करण्यास समर्थ नाही. इच्छाशक्ति हीच त्याचा अर्थ निश्चित करू शकते. जीवनार्थ प्रेरणेत इच्छाशक्ति ही अन्तर्भूत होते. निसर्गात सर्जनशक्तीच्या रूपाने शाश्वत चैतन्याची प्रतीति व भेट होत असते. आपल्या जीवनार्थ प्रेरणेत हीच सर्जनशक्ति इच्छाशक्तीच्या रूपाने अनुभवावयास मिळते. विश्व व जीवन यांच्या अस्तित्वाची किंवा सत्तेची हमी आणि नीतिशास्त्र या इच्छाशक्तीतून निष्पन्न होते. जीवनार्थ प्रेरणेचे तार्किक पृथक्करण करू लागले म्हणजे आपला विश्वाशी असलेला संबंध आपोआप सिद्ध होतो. इच्छाशक्तीचे आकलन विचार रूपाने करून पहा म्हणजे त्या इच्छाशक्तीचे आलंबन किंवा विषय विश्व होय. असा अर्थ त्यातून निघतो. अशा रीतीने जीवनदृष्टीचे विश्वदृष्टि हे कार्य ठरते.

जगातील विद्यमान धर्म व विविध मानवी संस्कृति यांचे चिंतन व समीक्षण करून मनुष्याच्या सांस्कृतिक जीवनाचे मूलभूत सिद्धान्त नव्या परिभाषेने नव्या स्वरूपात मांडण्याचा एक यशस्वी प्रयत्न श्वाइटझरने केला आहे. गटेच्या चरित्राचे व साहित्याचे यथार्थ दर्शन व तात्त्विक मूल्यमापन करणाऱ्यांमध्ये श्वाइटझरला उच्चतम मानाचे स्थान मिळाले आहे. गटेच्या जीवनाचा व साहित्याचा खोल प्रभाव त्याच्यावर पडला होता. वैज्ञानिक सत्याचे उत्कृष्ट समर्थन गटेने केले आहे. गटे एकदा असे म्हणाला की, पृथ्वी गोल असून सूर्याभोवती फिरते हा शोध बायबलपेक्षाही अधिक मोलाचा आहे परंपरागत श्रद्धा आणि पवित्र धर्मग्रंथ यांना वैज्ञानिक सत्यापुढे बाजूला सारण्याचे धैर्य पश्चिमी संस्कृतामध्ये किती खोल प्रभावी रीतीने निर्माण झाले होते व ते निर्माण करणाऱ्यांमध्ये गटेसारख्या विचारवंत व अद्वितीय साहित्यकार यांचा हात होता हे यावरून दिसते. श्वाइटझर खरा खिश्चन होता परंतु ऐतिहासिक खिस्ताच्या दृष्टिकोणाचे मर्यादित महत्त्व त्याला मान्य होते. मनुष्यजातीवरील विशेषतः दुःखित मानवावरील अमर्याद प्रेम व करुणा हाच खिस्ताच्या जीवनाचा गाभा असून ते विधायक, सक्रिय व विश्वव्यापी प्रेम हेच खिश्चन धर्मातील नैतिक परमसत्य होय असा श्वाइटझरने काढलेला खिस्तविषयक विचारांचा निष्कर्ष होय. या मूलभूत निष्कर्षांचे समर्थन करणारी विश्वाची, जीवनाची, संस्कृतीची व नीतीची तात्त्विक मीमांसा श्वाइटझरने मांडली आहे. ही मांडत असताना सत्यसंशोधनाची प्रेरणा त्याने शुद्ध बुद्धीने व निर्भयपणे मांडली. आपल्या आत्मचरित्रपर निबंधात तो म्हणतो– " अध्यात्माचे मौलिक स्वरूप सत्य हे आहे आणि प्रत्येक प्राप्त नवे सत्य म्हणजे नवा विजयच होय. इतिहास किंवा ज्ञानाचे इतर क्षेत्र यात सत्याचे शुद्ध मूल्यच स्वीकार्य ठरते. धर्मसंस्थेला प्रथम प्रथम ते मानवत नाही; पण त्याच्या स्वीकारात कसलाही धोका नसतो, अधिक गांभीर्यच त्यामुळे लाभते ऐतिहासिक सत्याशी धर्माने जुळतेच घेतले पाहिजे. सत्य विकत घ्यावे विकू नये. " श्वाइटझरने नव्या मूलभूत कल्पना व नव्या परिभाषा निर्माण केल्या आहेत व त्यात तात्त्विक विचार गुंफले आहेत. जीवनार्थ प्रेरणा ( Will–to–live ), विश्व व जीवन-यांच्या अस्तित्वाचे समर्थन ( World–and-life affirmation ), विश्व व जीवन यांचे निरसन (World–and life–negation) आणि जीवनाची पूजनीयता ( Reverence for life ) या शब्दावलींचा त्याच्या संस्कृति ( Civilization ) मीमांसेमध्ये वारंवार प्रयोग त्याने केलेला दिसतो. या मीमांसेचे सूत्ररूपाने सार असे सांगता येते:- जीवनार्थ प्रेरणा हेच जीवात्म्याचे किंवा 'मी 'चे स्वरूप होय. या प्रेरणेच्या अनुभवातूनच विश्व व जीवन यांच्या अस्तित्वाचा निर्धार निर्माण होतो. विश्वविषयक विचार तर्कबुद्धीने करीत असता अखेरीस त्यातून विश्वविषयक निश्चयात्मक तत्त्वज्ञान निष्पन्न होत नाही; अज्ञेयवादात








त्याचे पर्यवसान होते. या अज्ञेयवादालाही भिऊन चालत नाही. बुद्धिवादाच्या पातळीवर त्याला मान्यता द्यावी लागते. विश्व व जीवन यांच्या सत्तेचा निश्चय जीवनार्थ प्रेरणेच्या द्वारेच करावा लागतो. माझ्या जीवनाचे नैतिक उद्दिष्ट जीवनातच समावलेले असते. जीवनाची पूजनीयता हा नीतिशास्त्राचा मूलभूत सिद्धान्त आहे. हा जीवनाच्या पूजनीयतेचा निर्णय अतर्क–सिद्ध आहे. अतर्क–सिद्ध परंतु अनुभवाश्रित निर्णयाचा आधार घेतल्याशिवाय तर्काला वा बुद्धिवादाला गत्यंतर नसते. जीवनाच्या पूजनीयतेचा निर्णय हा अमर्याद व सर्व पातळीवरील जीवजातींना व्यापणारा असतो. सर्व मानव, अन्य प्राणिमात्र व वनस्पतीसृष्टी या सर्वांमध्ये पूजनीयतेचा अनुभव हेच नीतिशास्त्राचे रहस्य होय. विश्वव्यापी जीवनाची पूजनीयता हा नैतिक निष्कर्ष जीवनार्थ प्रेरणेतून साक्षातपणे निष्पन्न होतो. हाच जीवनाचा अर्थ व परमार्थ आहे, व सर्व मूल्यांचे उगमस्थान आहे. आध्यात्मिक गूढानुभवाला तार्किक स्वरूप देण्याचा प्रयत्न हिंदू, बौद्ध इत्यादि पूर्वेकडील धर्मांनी केला आहे. ज्या आध्यात्मिक गूढानुभवाला तार्किक नव्हे तर नैतिक स्वरूप येते, तोच जिवंत अनुभव होय. असा जिवंत आध्यात्मिक अनुभव खिस्ताच्या धर्माचा आधार होय. आज खिस्तधर्म किंवा जगातील इतर धर्म यांच्यामध्ये ही नैतिक धारणा प्रभाव गाजवीत नसल्यामुळे ते धर्म दुबळे राहिले आहेत. धर्म दुबळा आहे म्हणूनच युद्धसंस्था प्रबळ झाली आहे. मानवी संस्कृतीचा अधःपात होत आहे; मग ती युरोपातील, अमेरिकेतील, भारतातील, चीनमधील वा पश्चिम आशियातील असो.

विश्व आणि जीवन यांच्या अस्तित्वाचा निश्चय वा निर्धार हा या नीतिशास्त्राचाच एक परिणाम आहे. नैतिक हित वा पुण्य म्हणजे जीवनाचे रक्षण, संवर्धन आणि विकसन होय; आणि अहित वा पाप म्हणजे जीवनाची हिंसा, क्षति किंवा संकुचितता होय. माझे जीवन दुसऱ्याच्या जीवनाच्या रक्षणार्थ, संवर्धनार्थ व विकासार्थ जेव्हा यत्नशील असते तेव्हा विश्वाच्या अस्तित्वाचा निश्चय दृढमूल होतो. विश्वाचा अर्थ काय आहे हे जरी मला समजले नाही तरी अपरिहार्यपणे नैतिक वर्तनातून मूल्यनिर्मिती होत असते.

विश्व व जीवन यांचे निरसन करणारी म्हणजे त्याला मायामय ठरविणारी भारतीय तत्त्वज्ञानातील मुख्य विचारसरणी आहे. ही विचारसरणी जीवनार्थ प्रेरणेला दुर्बळ करते कारण ती निवृत्तिवादाचा महिमा गाते. विश्वव्यापी करुणेला किंवा प्रेमाला केवळ निष्क्रिय सहानुभूतीचे स्वरूप देते. खिश्चन धर्मामध्ये देखील प्रथमपासून विश्व व जीवन निरसनाची विचारसरणी निर्माण झालेली दिसते. परंतु गेली काही शतके पश्चिमी संस्कृतीमध्ये विश्व व जीवन यांच्या अस्तित्वाचा निर्धार प्रकट होण्याचे कारण खिस्तामध्ये सक्रिय व विधायक प्रेमाचे व करुणेचे उच्च आवाहन मुळात होते, हे होय; त्याच्यातून ऐहिक प्रगतीच्या पराक्रमालाही सामर्थ्य मिळाले. जगातील सर्वच संस्कृतीची रचना विश्वाच्या व जीवनाच्या अस्तित्वाच्या निर्धारावर झालेली असते. प्रगतीकरिता ( Progress ) प्रयत्न संस्कृतीची रचना करीत असतात. श्वाइटझरने संस्कृति म्हणजे काय याची समर्पक व्याख्या सांगितली आहे, ती अशी– "लोकांनी व व्यक्तिशः माणसांनी प्रत्येक दृष्टिकोणाच्या संदर्भात आणि प्रत्येक कर्मक्षेत्रात केलेल्या प्रगतीची गोळाबेरीज म्हणजे संस्कृति होय. ही प्रगतीची गोळाबेरीज व्यक्तींच्या आध्यात्मिक पूर्णतेला म्हणजे प्रगतीच्या प्रगतीला मदत करते, म्हणूनच ही प्रगति पूर्ण अर्थाने संस्कृति ठरते." माणसांच्या आणि समाजाच्या किंबहुना सर्व मानवजातीच्या परिस्थितीत सुधारणा करण्याचे प्रयत्न, इच्छा आणि आशा अशा आशावादी तत्त्वज्ञानाच्या योगाने निर्माण होऊ शकते. धार्मिक, आर्थिक आणि अन्य प्रकारच्या व्यावहारिक संघटना आणि संस्था यांची अंतिम परिणति म्हणजे मानवी चैतन्याने निसर्गशक्तीवर मिळवलेला विजय होय. जोपर्यंत हा विजय भौतिक प्रगतीस महत्त्व देतो परंतु आध्यात्मिक प्रगतीस गौण लेखतो तोपर्यंत संस्कृतीला अधःपाताचे व विनाशाचे भय राहते. ज्या प्रमाणात किंवा अनुपातात भौतिक बाजू प्रगत होते त्याच प्रमाणात किंवा अनुपातात आध्यात्मिक प्रगतीही व्हावयास पाहिजे. नाहीतर महासागरातील सुकाणू ढिला झालेल्या नौकेस विनाशाचे भय असते तसेच संस्कृतीलाही असते.

## श्वाइटझरच्या जीवनाची रूपरेषा

डॉ. अल्बर्ट श्वाइटझरचे आयुष्य दुःखित, व्यथित व पतित, रानटीपणाच्या अज्ञानतमात युगानुयुगे रुत-



अनुक्रमणिका

लेल्या व गुलामगिरीत पिचत असलेल्या विषुववृत्तावरील काळ्या मानवांच्या दुःखविमोचनार्थ ५२ वर्षे व्यतीत झाले. त्याने वयाच्या ८ व्या वर्षीच वादन संगीताच्या अभ्यासास सुरुवात केली. १८ व्या वर्षी पॅरिस येथील सुप्रसिद्ध संगीततज्ञ विडोर ( Widor ) याच्या हाताखाली तो वादननिपुण बनला; ट्रासबर्ग विद्यापीठात ४ वर्षे देवविद्या, तत्त्वज्ञान आणि संगीताचे तत्त्वज्ञान यांचे अध्ययन केले. त्याचवेळी त्याचा एक वादन-संगीताचा गुरु युजीन मंच याचे चरित्र त्याने फ्रेंचमध्ये लिहिले. नंतर त्याच सुमारास एक वर्षपर्यंत लष्करात नोकरी केली. वयाच्या २२ व्या वर्षी १८९७ मध्ये श्लाएरमाखर या जर्मन धर्मशास्त्रज्ञाने लिहिलेल्या खिस्ताच्या अंतिम भोजनासंबंधी विचारांवर लूथर, झिंवगली आणि कॅलव्हिन यांच्या विचाराशी तुलना करणारा निबंध लिहिला. १९९८ साली म्हणजे वयाच्या २३ व्या वर्षी खिश्चन धर्माच्या इतिहासावर लेख लिहून परीक्षा उत्तीर्ण झाला. वयाच्या २४ व्या वर्षी काण्टच्या सर्व ग्रंथांचे अध्ययन केले व त्याचवर्षी विंल्डेल-बाण्ड आणि झिग्लर यांच्या मार्गदर्शनाखाली ट्रासबर्गची पीएच्. डी. तत्त्वज्ञान विषयात संपादन केली. त्याच वर्षी काण्टचे धार्मिक तत्त्वज्ञान, बुद्धिवाद आणि धर्म या विषयावर ग्रंथ लिहून प्रसिद्ध केला. १९०१ साली धर्ममहाविद्यालयाच्या प्राचार्यपदी नियुक्ति झाली व त्याचवर्षी ईश्वरी राज्याची गूढता यावर पुस्तक लिहून प्रसिद्ध केले. वयाच्या ३० व्या वर्षी १४ जानेवारी १९०५ ला म्हणजे स्वतःच्या वाढदिवसाला जीवनातील उच्चतम कर्तव्याचा निर्णय घेतला. विषुववृत्ताच्या आफ्रिकेत जाऊन डॉक्टर म्हणून काळ्या लोकांची सेवा करण्याचे ठरविले, व त्याकरिता पाश्चात्य वैद्यकाचे अध्ययन केले. या अध्ययनाच्या कालावधीत पश्चिमी संगीतसंशोधक व कवि जे. एस्. बाख याच्यावर फ्रेंचमध्ये व खिस्ताच्या चरित्रावर संशोधनात्मक प्रबंध जर्मन भाषेत लिहिला. १९०९ साली व्हिएन्ना येथे भरलेल्या आंतरराष्ट्रीय संगीत समाजाच्या तिसऱ्या कॉंग्रेसमध्ये भाषण दिले आणि वादन संगीताची आंतरराष्ट्रीय नियमधारा तयार केली. १९११ साली म्युनिक येथे साजऱ्या झालेल्या फ्रेंच संगीताच्या महोत्सवात समूहवादनात भाग घेतला व त्याचवर्षी वैद्यकाची परीक्षा उत्तीर्ण झाला. १९१२ साली हेलेन ब्रेसलॉ या महिलेशी लग्न झाले. २६ मार्च १९१३ ला सपत्नीक आफ्रिकेस प्रयाण करून लँबरिनी या गावी रुग्णालय स्थापन केले. १९१३ ते १९६५ पर्यंतचे आयुष्य प्रामुख्याने याच स्थानी दुःखितांच्या सेवेत घालविले. युरोपमध्ये मधूनमधून येणे जाणे होत होते. तेव्हा अनेक संशोधन संस्था आणि विद्यापीठे यांच्यामध्ये व्याख्यानमाला गुंफून मिळालेली सर्व रक्कम या रुग्णालयाकरिताच खर्च केली. धर्म, संस्कृति, इतिहास व कला या विषयावर फ्रेंच व जर्मन भाषेत लिहिलेल्या पुस्तकांपासून होणारी प्राप्तीही याच कार्यात खर्च केली. १९५४ साली शांततेचे नोबेल पारितोषिक मिळाले तेही सुमारे सव्वा लाख रुपये महारोग्यांचे रुग्णालय बांधण्याकरिता खर्च केले.

आफ्रिकेतील गलिच्छ रानटी काळ्या लोकात सेवा करीत असताना कित्येक वेळा त्यांचा अडाणीपणा आणि मौर्ख्य पाहून श्वाइटझरला उबगही येत असे. एकदा असे झाले की, वैतागून खुर्चीत त्याने अंग टाकले होते. "या जंगली लोकांच्या सहवासात राहण्याचा हा माझा उद्योग माझ्या अस्सल निर्बुद्ध-पणाचा पुरावा होय" असे उद्गार अचानक बाहेर पडले. जवळच एक निग्रो द्वाररक्षक उभा होता. त्याने श्वाइटझरला उत्तर दिले– "या निग्रोंच्या जगात राहणारा निर्बुद्ध तू स्वर्गात स्थान मिळविले आहेस!"

**डॉ. अल्बर्ट श्वाइटझरचे काही महत्त्वाचे निबंध व प्रबंध.**

1. On the Edge of the Primeval Forest and the Forest Hospital at Lambarene. Both translated by C. T. Campion. Combined in one volume. New York: The Macmillan Company, 1948.
2. Out of My life and Thought. Translated by C. T. Campion. New York: Henry Holt and company, 1948.
3. My First Organ Teacher : Eugene Munch, 1857-1888.



अनुक्रमणिका






4. Goethe: Four Studies. Translated by Charles R. Joy. Boston: The Beacon Press, 1949.
5. Christianity and the Religions of the World. Translated by Joanna Powers. New York: Henry Holt and Company, 1939.
6. The mystery of the kingdom of God. Translated by Walter Lowrie. New York: Dodd, Mead & Company, 1914.
7. The Quest of the Historical Jesus: A Critical study of Its progress from Reimarus to Wrede. Translated by W. Montgomery. New York: The Macmillan Company, 1945.
8. Civilization and Ethics. Being Part II of the Philosophy of Civilization. Translated by C. T. Campion. New York: The Macmillan Company, 1929.
9. The Decay and Restoration of Civilization. Translated by C. T. Campion. New York: The Macmillan Company, 1932.
10. Indian Thought and Its Development. Translated by Mrs. C. E. B. Russell. New York: Henry Holt and Company. 1936.
11. Johann Sebastian Bach, Translated by Ernest Newman. London: A. and C. Black. 1938.
12. The Animal World of Albert Schweitzer. Translated and edited by Charles R. Joy. Boston: The Beacon Press, 1950.
13. The Wit and Wisdom of Albert Schweitzer. A Book of epigrams compiled with on introduction by Charles R. Joy. Boston: The Beacon Press, 1949.

---


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास


नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष

ले. जेरल्ड सेगल

# रशियन अर्थव्यवस्थेत घडून येणारी क्रांती

( फोरम सर्व्हिस, २४ जुलै १९६५ )

व्यवस्थापकाधीन ( Managerial ) समाजसंस्था उगम पावत असून ती पक्षीय अधिसत्तेस भेडसावीत आहे. हे सत्य एकंदरीत सोविएट संबंधी घडामोडींच्या व विशेषतः सोविएट अर्थव्यवस्थेच्या अभ्यासकांसमोर प्रकट झाले आहे. अर्थव्यवस्थेतील प्रत्यक्ष घडणारी घटना पक्षीय नेतृत्वाच्या उपयुक्ततेचे महत्त्व कमी करू लागलेली आहे, याची उघड कबुली सोविएट लेखक व तत्त्वचिंतक देऊ लागले आहेत.

वाढीस लागलेले उद्योगांचे स्वयंचलन ( automation ) व यातून उद्भवणारे बेकारीचे व अनावश्यकतेचे प्रश्नच कम्युनिस्ट राज्यात उत्पन्न होत नाहीत व झाले तरी ते पश्चिमी लोकशाही राज्यांपेक्षा अधिक चांगल्या रीतीने सोडविता येतात, असा सोविएटच्या नेत्यांचा नेहमीचा दावा होता व अनेक पश्चिमी समीक्षकांना तो मान्य होता. परंतु काही आठवड्यांपूर्वी 'आर्थिक प्रश्न' या नियतकालिकात डॉ. वाय्. मान्येविक ह्या सोविएटच्या प्रमुख अर्थशास्त्रज्ञाने कबूल केले की, उद्योगात स्वयंचलन प्रविष्ट झाल्यावरोवर त्याच्या पाठीमागून बेकारीही घुसली आणि विशेषतः सप्तवार्षिक नियोजनाच्या प्रारंभी ( सन १९५९ ) लेनिनग्राड, मास्को, ओडेसा आणि इतर शहरे यांमध्ये बेकार दिसू लागले. त्याने अशीही मागणी केली की, स्वयंचलनास्तव काम कमी झाल्यामुळे अनावश्यक ठरलेल्या कामगारांना पुनः प्रशिक्षणाच्या कालावधीत आधार देण्याकरिता एक प्रकारची भत्ता देण्याची पद्धती आणणे आवश्यक आहे.

याच समयी, ए. ॲगन् बेग्यान् या अर्थशास्त्रज्ञाने असा आरोप केला की, सोविएट सरकारने प्रसिद्ध केलेली संख्यानके ( statistics ) अविश्वसनीय आहेत; म्हणून अमेरिकन समीक्षकांनी सोविएट अर्थव्यवस्थेच्या अध्ययनार्थ स्वतःच्या उपयोगाकरिता तयार केलेले आकडेच सोविएट अर्थशास्त्रज्ञांनी वापरणे योग्य होय, असेही प्रतिपादले. हाच सोविएट अर्थशास्त्रज्ञ गणितीय पद्धती व कॉम्प्यूटरचे तंत्र वापरण्याचा यत्न करणाऱ्यांचा पुढाकार करीत आला आहे.

वरील उद्धरणांमध्ये गर्भित असलेले मुद्दे अधिक खोल आहेत. आणि सोविएट समाजसंस्थेमध्ये खोल तडे पडत आहेत याचे दर्शक ते मुद्दे आहेत. हे तडे कम्युनिस्ट समाजाच्या खोल गाभ्यातून वर आले आहेत; कम्युनिस्ट क्रांतीच्या तात्त्विक बैठकीवरून त्यांचे आकलन करता येत नाही. त्याचा परिणाम असा झाला आहे की सन १९१७ च्या बोल्शेविक क्रांतीतून निर्माण झालेल्या जगासंबंधीच्या सबंध विचाराला आव्हान मिळाले आहे.

मार्क्सवादी-लेनिनवादी ऐतिहासिक क्रमाप्रमाणे सोविएट संघ समाजवादी अवस्थेतून कम्युनिस्ट परिणतीकडे निःशंकपणे जात आहे; कम्युनिझमचा भौतिक-तांत्रिक पाया रचला जाणार, असे म्हटले जाते. सन १९६० साली २० वर्षांचे नियोजन आखले; यावेळी अमेरिकन लोकांना प्राप्त झालेल्या जीवनस्तरापेक्षा अधिक वरचा जीवनस्तर सोविएट समाजाला १९८० साली प्राप्त व्हावा; आणि १९८० सालानंतरची सोविएट अर्थव्यवस्था " सर्व व्यक्तींच्या योग्यतेप्रमाणे काम घेतले जाईल व सर्व व्यक्तींना त्यांच्या गरजांप्रमाणे प्राप्ती होईल " या तत्त्वाधारे कार्यवाहीत येईल. कोणताही समाज केव्हातरी व कोठेतरी अशा तत्त्वांच्या आधारे कार्यवाही करू लागेल हीच गोष्ट संयमाने वोलायचे तर शंकास्पद ठरते. रशियनांच्या दृष्टीला निराशाजनक विचित्र भवितव्य अलीकडे असे दिसू लागले आहे की, क्रांतीच्या साम्यवादी उद्दिष्टांच्या साफल्याशी सन १९६१ पासून अमलात आणावयाचा साम्यवादी कार्यक्रम व २० वर्षांचे आर्थिक विकासाचे नियोजन मार्क्सवादी-लेनिनवादी भाष्यानुसार अत्यंत विसंगत ठरत आहे.

### भूतकाळाचे ओझे

पक्षीय कार्यक्रम असे निश्चयाने सांगत आहे की, सोविएट संघात " सम्पूर्ण जनतेचे राज्य " आहे. त्याचा अर्थ असा की, सोविएट संघात परस्परविरोधी वर्ग अस्तित्वात नाहीत ; उत्पादनसाधनांवरील खाजगी वैयक्तिक मालकी हक्क नष्ट करून समाज-








वादाची स्थापना झाली आहे ; अजूनही भिन्नवर्ग आहेत व ते म्हणजे कामगार व शेतकरी ; परंतु त्यांपैकी कोणीही खाजगी मालकीहक्कांच्या द्वारे एकमेकांची पिळवणूक करू शकत नाही, कारण तसे हक्कच राहिले नाहीत; त्यामुळे ते एकमेकांचे सख्यमय सहकारी बनले आहेत.

बाहेरील निरीक्षकास हे विधान लोकशाही उद्दिष्टाचा निर्देश करणारे अतएव समाधानकारक दिसेल हे खरे असले तरी सोविएट कम्युनिस्ट पक्षाच्या दृष्टिकोणाप्रमाणे त्यांना अनेक प्रश्नांना व अडचणींना तोंड द्यावे लागत आहे. अगदी मागे सन १९३४ मध्येच वरील प्रकारचा समाजवाद स्थापित झाला आहे, परंतु स्टालिनने संपूर्ण जनतेचे राज्य या कल्पनेचा स्वीकार करून चालायच्याऐवजी, समाजवादाची जसजशी प्रगती होते तसतसा वर्गविग्रह तीव्र होतो, अशी विचारसरणी स्वीकारली. आता असत्य म्हणून मान्य केलेल्या तत्त्वानुसारेच स्टालीनने १९३५ पासूनच्या काळात पक्षशुद्धीकरणाचे खुनी प्रयत्न केले व कामाची जबरदस्ती व सक्ती करणाऱ्या कामगारास राबविणाऱ्या संघटना स्थापल्या. सोविएट जनतेला अजून या गोष्टीची स्मृती सोडत नाही; व सत्ताधारी पक्षाला या गोष्टीने निर्मिलेल्या मानसिक अविश्वासास त्यातून उतीर्ण होताना तोंड द्यावे लागत आहे.

## चिनी मतभेद

आणखी असे की, " संपूर्ण जनतेचे राज्य " ही कल्पनाच मार्क्सवाद-लेनिनवादाच्या विरुद्ध आहे; असे चिनी कम्युनिस्टांनी दाखविले आहे. त्यांचा युक्तिवाद असा की, मार्क्सच्या मते व्याख्यानुसारे राज्य म्हणजे एका वर्गाने दुसऱ्या वर्गाची दडपशाही करण्याचे हत्यार होय. अंतिम वर्गनाशानंतर राज्यही अस्तित्वात रहात नसते. मार्क्सने आणखी असा युक्तिवाद केला आहे की, भांडवलशाही व साम्यवादी समाज-व्यवस्था यांच्या मध्यंतरी अशी स्थिती राहते की, त्यात एकातून दुसरीत क्रांतिकारी रूपांतर होत असते. " या रूपान्तरास संवादी राजकीय परिवर्तनाचा कालखंड येतो. त्यात राज्य म्हणजे कामगारवर्गाची क्रांतिकारी हुकूमशाही, याशिवाय दुसरे काहीही असू शकत नाही." अर्थात् रशियनांचे यासही उत्तर आहे. ते युक्तिवाद करतात की, ज्याला ते स्वतः समाजवादी म्हणतात त्यालाच मार्क्सने कम्युनिस्ट समाज म्हटले आहे ; आणि समाजवाद ( कामाप्रमाणे दाम ) आणि कम्युनिझम् (गरजांप्रमाणे दाम) या दोन अवस्थांना कामगार हुकूमशाही लागू होत नाही; यामध्ये 'संपूर्ण जनतेचे राज्य'च शक्य होते.

चिनी साम्यवाद्यांना त्यांच्या काही उद्देशांच्या दृष्टीने हे काहीही मान्य नाही. कामगार हुकूमशाही अमान्य करणे म्हणजे पक्षाची हुकूमशाही अमान्य करणे होय. (–कारण पक्ष हा कामगारांचा प्रतिनिधीच होय.–असा दावा केला जातो–) याचा परिणाम असा होतो की त्यामुळे सर्व साम्यवादी राज्यातील साम्यवादी पक्षांची अधिसत्ता अमान्य ठरते.

"संपूर्ण जनतेचे राज्य" याचा तर्कशुद्ध निष्कर्ष असा निघतो की, राज्याच्या सर्व लोकांना, म्हणजे सर्व नागरिकांना राज्याचे धोरण स्वातंत्र्याने ठरविण्याचा अधिकार मिळाला पाहिजे, यातून मुक्त निवडणुका व लोकशाही संसद पाहिजे असे मुद्दे एकदम निघतात. यातून मुक्त निवडणुकीने तयार झालेल्या ( Constituent Assembly ) संविधान समितीच्या छायांचा पुर्नजन्म होतो; संविधान समिती हे १९१७ च्या फेब्रुवारी-क्रांतीचे फळ होय; ही समिती त्याचसाली ७ महिन्यांनंतर साम्यवाद्यांनी अधिक व्यापक सामाजिक व आर्थिक स्वातंत्र्याच्या नावाखाली नष्ट केली. जागतिक (Perspective) दृष्टिक्षेत्रानुसारे याचा अर्थ एवढाच होतो की, पश्चिमी भांडवलशाही लोकसत्तांनी लक्षित होणाऱ्या समाजव्यवस्थेकडे रशियन लोक सरकत आहेत.

## लांबवर पसरणारी राजकीय परिवर्तने

आपली सत्ता टाकण्यास स्वाभाविकपणे नाखुष असलेला सोविएट कम्युनिस्ट पक्ष आपल्या वांडगुळी अस्तित्वाचे तर्कप्राप्त परिणाम टाळण्यासाठी धडपडत आहे; 'संपूर्ण जनतेचा पक्ष' या कल्पनेचा प्रस्ताव करून ऐतिहासिक स्थित्यंतराकडे सरकू पहात आहे. कामगार-हुकूमशाहीच्या गतकालखंडात कामगारांना न विचारताच त्यांच्या नावाने पक्ष कामे उरकत असे; व त्याकरिता ऐतिहासिक आवश्यकता वा राजकीय








सिद्धान्त यांचा सोविएट जनतेने आपले हक्क पक्षाकडे का सुपूर्द करावे या गोष्टीच्या समर्थनार्थ उपयोग केला जात होता; तशी आता स्थिती राहिली नाही. अजून अनिर्णित राहिलेल्या मुद्यांच्या बाबतीत झगडत राहणे हीच सध्याची अवस्था आहे; जेथे एके काळी केवळ पक्षाचाच आवाज ऐकला जात असे त्या क्षेत्रामध्ये निराळ्याच शक्ती व कल्पना अतिक्रमण करू लागल्या आहेत; याचा विचार करता हे स्पष्ट दिसते की, कम्युनिस्ट पक्ष शेवटी गमवावा लागणारा झगडा झगडत आहे, असेच सद्य:स्थितीचे चित्र आहे. मार्क्सवाद-लेनिनवाद वा विरोधविकासी भौतिकवाद यांच्या नावाने व्यापलेल्या व आक्रमिलेल्या स्थानांपासून सक्तीने माघार घेण्याचे काम पक्षास करावे लागत आहे, या गोष्टीमुळे सोविएट जनतेच्या दृष्टीने पक्षाचा महिमा अपरिहार्यपणे निश्चितपणे कमी होत जाणार.

## वैज्ञानिक दृष्टि

विज्ञानाच्या बाबतीत असे झाले आहे की, लायन्सेकोवादाचा परित्याग केला आहे आणि मेंडलेमॉर्गनवादाच्या पश्चिमी परंपरेकडे परतावे लागले आहे. याचा अर्थ फार मोठा आहे. एक विचारसरणी सोडून दुसरी विचारसरणी पत्करणे एवढाच नाही; पूर्वी पक्ष असा युक्तिवाद करीत असे की, लायन्सेको आणि त्याच्या पाठीशी असलेली म्युचिरिन परंपरा, प्रत्यक्षात आचरणात आणलेल्या भौतिकवादाचे प्रत्यंतर आहे; मेंडले-मॉर्गनवाद्यांच्या भांडवलशाही भाववादाशी याचा विरोध आहे. परंतु आता लायन्सेको याची हकालपट्टी केली आहे, आणि जननशास्त्रावरील त्याचे विचार टाकले आहेत; यावरून असे निष्पन्न होते की, एकतर पक्षाला विरोध-विकासी भौतिकवाद कळेनासा झाला आहे किंवा त्या तत्त्वज्ञानातच दोष आहे. यापासून निष्पन्न होणारी राजकीय स्थित्यंतरे दूरवर पसरली आहेत. शेतीच्या उत्पन्नातील खूट आणि वैज्ञानिक संशोधन कार्य एवढ्याशीच याचा संबंध राहिला नाही. कम्युनिस्ट पक्षाने लायन्सेकोचे विचार पत्करल्यामुळे त्याचे प्रत्यक्ष दुष्परिणाम शेतीचे उत्पन्न व वैज्ञानिक संशोधन यावर झाले होते. ग्रेगर मेंडलेचे त्याच्या धर्मोपदेशकाच्या पेशातील चित्रे प्रकाशित केली आहेत. त्याचप्रमाणे आनुवंशिकता विशिष्ट बीजकणांवर आधारलेली असते, तिच्यात परिस्थिती बदलल्याने प्रत्यक्ष बदल होत नाहीत, हा मेंडलेचा सिद्धान्तही त्याबरोबरच प्रकाशित केला आहे. सोविएट राज्याचा आधारभूत असलेला मानवी स्वभावाबद्दलचा सिद्धान्तही आता संशयात सापडला आहे. समाजवादाची उभारणी होत असताना नवा सोविएट मनुष्य अवतरेल; कारण मानवी स्वभाव बदलता येतो; हा तो सिद्धान्त होय.

## समाजाचे रूपांतर

अर्थव्यवस्थेच्या बाबतीत असे म्हणता येते की, नफ्याची कसोटी ही कर्तबगारीची मापक होय असे मानून वाढत्या प्रमाणात ती कसोटी लागू केली जात आहे. याचा परिणाम म्हणजे नव्या प्रकारचा भांडवलदार व्यवस्थापक तंत्रज्ञ वरिष्ठवर्ग तयार होत जाणार आहे, एवढेच नव्हे तर कारखान्यातील कम्युनिस्ट पक्षीय व्यवस्थापकाची नेमणूक विसंगत होय हेही उघडकीस येणार आहे.

गेल्या जुलैच्या पहिल्या आठवड्यात हलके आणि ग्राहकांच्या गरजा पुरवणारे जवळजवळ ४०० प्रकारचे कारखाने नफ्याच्या प्रलोभन पद्धतीवर आणून सोडले आहेत. परंतु असे होत असूनही बरेच विदेशी अर्थशास्त्रज्ञ ही गोष्ट नाकारतात की, सोविएट अर्थव्यवस्थेतील एक प्रकारच्या भांडवलशाही पद्धतीकडे नेणाऱ्या व्यापक परिवर्तनाचा हा प्रारंभ आहे; परंतु प्रस्तुत लेखकाचे मत असे आहे की, मार्क्सवादी-लेनिनवादी पक्षाची अधिसत्ता असलेले राज्य रूपांतर पावत असून व्यवस्थापकाधीन समाज असे त्याचे नवे रूप अपरिहार्यपणे अखेरीस बनणार आहे.

असे मत बनण्याचे कारण असे आहे की, नफ्याचा उद्देश हा केवळ उद्योगाच्या एकाच शाखेमध्ये मर्यादित करता येणे शक्य नाही. ही गोष्ट उघड आहे की, पादत्राणे उत्पादन करणाऱ्या किंवा पोषाख तयार करणाऱ्या कारखान्याचा व्यवस्थापक असाही वेगळा निर्णय घेऊ शकेल की त्याच्या नफ्याची अधिक वाढ होण्याकरिता कातड्याऐवजी कृत्रिम रबर किंवा रेशमाच्या ऐवजी नॉयलॉन उत्पन्न करणे अधिक उपयुक्त होय. याकरिता माल पुरवठा करणाऱ्या



अनुक्रमणिका






मंडळींकडे निराळ्या प्रकारच्या कच्च्या मालाचा वा निराळ्या प्रकारच्या यंत्रसामग्रीचा पुरवठा करण्याची मागणी होऊ लागेल. हीही गोष्ट ध्यानात घेतली पाहिजे की, नफ्याची योजना मुळात सुचविणारा प्रा. येवसेइ लायबरमन याने नफ्याची योजना प्रथम अभियांत्रिकी उद्योगांच्या संदर्भात सुचविली. '(१९५६ मध्ये आणि नंतर १९६२ मध्ये). आणखी असे की, सोविएट प्रधानमंत्री कोसिजिन यांनी असे जाहीर केले आहे की, शासन आणि पक्ष हे दोन्ही नव्या योजनेचा संबंध हलक्या उद्योगांनाच लागू न करता तो अवजड उद्योगांना लागू करावा ही गोष्ट शक्य होण्याकरिता प्रयत्न करीत आहेत. (डिसेंबर १९६४ मधील वरिष्ठ सोविएटपुढील भाषण).

नफ्याच्या उद्देशार्थ तयार केलेल्या योजनेस विरोध करणारे सोविएटचे अतर्गत गटसुद्धा आता बदलू लागलेले दिसतात. उदाहरणार्थ अर्थशास्त्रज्ञ डी. वेल्किन् 'इझव्हेस्तिया' या वृत्तपत्रात पुढील विचारसरणी स्वीकारीत आहेत– नफ्याचे टीकाकार पावित्र्याचा आव आणून नफा म्हणजेच भांडवलशाही असे समीकरण मांडतात; परंतु नफ्याची आकांक्षा हा भांडवलशाहीचा खरा दोष नव्हे. भांडवलशाहीचा खरा दोष विभजनातला आहे. श्रमाचा वेळ किती झाला यावर उत्पन्न न घेता भांडवलाच्या मालकीच्या जोरावर उत्पन्न काढणे हा भांडवलशाहीचा खरा दोष होय. अर्थशास्त्रज्ञ वेलकिन् याने एकाच महत्त्वाच्या गोष्टीकडे दुर्लक्ष केले आहे ती ही की, पश्चिमी भांडवलशाही लोकसत्तांच्यामध्ये राज्याला कर आकारण्याची फार मोठी शक्ती आहे. तात्पर्य असे की, या नव्या धोरणामुळे व्यवस्थापकांनी नियंत्रित केलेली ग्राहकांच्या अधिष्ठानावर उभारलेली समाजसंस्था अस्तित्वात येण्यास मार्ग मोकळा झाला आहे. या समाजसंस्थेत व्यवस्थापक मंडळी मिळेल त्या साधनसामग्रीचा उपयोग करून मोठ्या कार्यक्षमतेने समाजसंस्था चालवू लागतील. या समाजसंस्थेतील राज्य स्वसंरक्षणाकरिता आवश्यक असलेला कार्यक्रम अमलात आणील. पश्चिमी जगामध्येही अशीच अर्थव्यवस्था आज चालू आहे.

## नव्या युगाचे ताण

या नव्या योजनेचा परिणाम अवजड उद्योगांच्या वाढीला प्राथम्य प्राप्त करून देण्याच्या जुन्या प्रश्नावर होईल असे नाही; परतु सोविएट आर्थिक प्रगतीची कसोटी अवजड उद्योग होत या विचाराचा परित्यागही शक्य आहे. एक अगदी विलक्षण गोष्ट अशी: 'इकॉनामिक गॅझेट' मध्ये थोड्या आठवड्यांपूर्वी एका सोविएट अर्थशास्त्रज्ञाच्या लेखांत ती आहे. तो म्हणतो की, मार्क्स व त्यानंतर लेनिन यांनी अवजड उद्योगांना हलक्या उद्योगांच्याऐवजी प्राथम्य जे दिले ते केवळ भांडवलशाही अर्थव्यवस्थेस अनुलक्षून; समाजवादी अर्थव्यवस्थेस अनुलक्षून नव्हे. सोविएट अर्थव्यवस्थेस वळण देण्याच्या दृष्टीने उत्पन्न झालेले नवे अवघड मुद्दे वगळले तरी या लेखात एक गोष्ट मान्य केली आहे की स्टालीनच्या कालखंडात सोविएट जनतेवर निघृणपणे व लोकांच्या प्राणांचीही पर्वा न करता लादलेले सर्व तऱ्हेचे औद्योगीकरणाचे धोरण समाजवादाच्या गरजांच्या दृष्टीने अनावश्यक व अन्याय्य होते. या प्रकारच्या कबुलीमुळे मात्र सोविएट कम्युनिस्ट पक्ष व जनता यांचे संबंध अधिक दुर्बल होतील.

अलीकडे पुर्नविचार सुरू आहे याची खूणगाठ प्रावदाचा एक स्तंभलेखक व सोविएट समालोचक एफ्. बर्लाटस्कीने केलेल्या विनंतीत आढळते; तो म्हणतो की, राज्यशास्त्र एक स्वतंत्र व्यवस्था म्हणून स्वीकारून त्या क्षेत्रात संशोधनाची आवश्यकता आहे. ही गोष्ट खरोखर आवश्यक आहे याचे कारण मानवी समाजाच्या विकासाचा अर्थ सांगणारा मार्क्सचा ऐतिहासिक भौतिकवाद सोविएट जनतेला त्रस्त करणारे नव नवे गुंतागुंतीचे विविध मुद्दे उलगडण्यास, उपयुक्त उत्तर देण्यास असमर्थ ठरत आहे. समाजवादी व भांडवलवादी राज्यांमधील राजकीय (वर्ग) संबंध, आंतरराष्ट्रीय क्षेत्रातील राज्याराज्यामधील व पक्षांमधील संबंध, हे विषय या (सोविएटच्या दृष्टीने) नव्या विज्ञानाच्या अध्ययनाच्या क्षेत्रात अन्तर्भूत केले आहेत. समाजवादाचे उद्दिष्ट समाजातील वर्गभेदांचे विसर्जन हे होय. ही गोष्ट मनासमोर ठेवली तर समाजवादी समाजातील वर्गसंबंध हा सोविएटच्या








अध्ययनाचा विषय होता, यामुळे एक निराळीच कबूली मिळते. परंतु नोवोसिर्विक विद्यापीठातील एका गटाने नव्यानेच अंगिकारलेल्या सामाजिक संशोधनाने या प्रश्नावर नवा प्रकाश टाकला आहे. त्यात असे आढळून आले आहे की, शेतमजुरांच्या ९० टक्के मुलांना शालान्त परीक्षेनंतर लगेच कामावर जावे लागले; त्यांपैकी केवळ १० टक्के मुलानाच कामावर जाण्याची इच्छा होती; बाकीच्यांना उच्च शिक्षणाची हौस होती; उलट शहरातील बुद्धीजीवी वर्गातील मुलांपैकी ८२ टक्के मुले उच्च शिक्षण-क्रमात जाऊ शकली. निष्कर्ष असा निघाला की, "भिन्न सामाजिक वर्गातील तरुणांचे जीवनमार्ग अजून मोठ्या प्रमाणात भिन्नच राहिले आहेत". पुढे असे म्हटले आहे की "शेतकरी व कामगार वर्गातील तरुणांना उच्च शिक्षणास संधी मिळण्याचे प्रमाणात जी घट होत आहे ती थांबविली पाहिजे. विशेषतः ग्रामीण तरुणांच्या बाबतीत खबरदारी जास्त घेतली पाहिजे."

नव्या युगाचे जे ताण मुळापासून पडत आहेत त्यामुळे क्रांतीनंतर निर्माण झालेली परंतु लगेच जुनी झालेली व्यवस्था ढासळत आहे, असे चित्र प्रकट होत आहे. हा परिवर्तनाचा समय आहे, परंतु परिवर्तन कोणत्या दिशेकडे वळण घेईल हे निश्चितपणे सांगणे कठीण आहे.

---





अनुक्रमणिका

श्री. शं. बा. जोशी

# अदिती व अंभृणी देवी

**मागील संदर्भ –**

आतापर्यंत अदिति–विष्णु व अदिति-रुद्र, यांच्या संबंधाची समीक्षा झाली. देवता–सूक्ते व स्तोत्रे यातून त्या त्या दैवतांचे माहात्म्य वर्णिलेले असते, हे सर्वांना माहीत आहेच. देवतामाहात्म्याबरोबरच त्या दैवतांचे स्वरूप व त्यांची दिव्य शक्ती यांचीही स्तुती करण्याची पद्धत आहे. ऋग्वेदसूक्तांतील अशा प्रकारच्या वर्णनात काही विशिष्ट संकेत-प्रतिमा वापरल्याचे आढळून येते. या संकेतात गूढार्थ अंतर्भूत असल्याचे, त्या कवींनी मोकळेपणाने सांगितले आहे: हे अग्ने, तू 'पासि गुह्यं नाम गोनाम्' अशा वाक्यात 'गो' संकेत गूढार्थसूचक असल्याचे स्पष्टपणे सांगून टाकले आहे. "गुह्यं नाम" संकेताचा असा ( V. ३.३ ) स्पष्ट उल्लेख असल्यामुळे, या सूक्तांचा अर्थ ठरविताना तेथे वापरलेल्या संकेतांचा निश्चित अर्थ काय, हे जाणणे आद्य कर्तव्य ठरते.

या संकेतांचा निश्चित असा एकमेव अर्थ, प्रथमच गृहीत धरणे धाडसाचे होईल ! या संकेतांचा आपल्याला सोइस्कर असा अर्थ लावण्याचा अपराध लेखकांकडून, कळत वा न कळत घडण्याची धास्ती आहे! आपल्या हातून ही चूक बुद्धिपूर्वक घडू नये म्हणून सत्यनिष्ठ अभ्यासकाने, अशा प्रत्येक संदर्भात, डोळ्यात तेल घालून जागरूक असणे अत्यंत आवश्यक आहे. आपल्या "भाष्य" रूपी प्रतिपादन–पद्धतीत ( exposition ) या स्वरूपाच्या दोषांस खूपच जागा मिळते. म्हणून संकेतांतील अर्थ आपोआप उलगडेल अशा विवरणात्मक ( explanatary ) पद्धतीस, अशा लेखनात विशेष प्राधान्य दिले पाहिजे. पण विवरणात्मक पद्धतीत प्रतिपादनाचा अभाव असतो असे सांगण्याचा उद्देश अजीबात नाही. अर्थ लावताना, निःपक्षपाती, अलिप्त दृष्टी ठेवण्यात ज्या प्रमाणात यश येईल, तेवढ्या प्रमाणात सूक्तांच्या सत्य अर्थाची प्रतीती येणे शक्य होईल. अभ्यासविषयाच्या पूर्वापर संदर्भात ( संपूर्ण तटस्थ भूमिकेवरून) दृष्टिगोचर होणारा अर्थ स्वीकारून आपल्या विवरणात्मक पद्धतीने विषय प्रतिपादन करणे आवश्यक ठरते.

'मधुमत्पयः' स्रवणारी अदिती व ही अदिती ज्याची पत्नी म्हणतात तो विष्णू, परम–पदातून मधुस्रोताचा उगम असलेला ! हे दोन्ही संकेत एकमेकांपुढे मांडून समीक्षण केल्यास अदिती व विष्णू यामधील आंतरिक **स-रस** संबंध प्रतीतीस येतो. देवतावर्णनातील संकेत एकमेकाजवळ येताच असे स्वयंभू अर्थदायक होणारे हे (विवरणात्मक) प्रतिपादन, भाष्यस्वरूपाचे, मंडनात्मक प्रतिपादन असे म्हणता येणार नाही. शिवाय, येथे विवरण करणारा, स्वतःचा विशिष्ट अर्थ लादीत आहे, अशा आरोपालाही जागा उरत नाही. या अर्थांसाठी शब्दकोषादी बाह्य प्रमाणावर अवलंबून राहण्याची आवश्यकता वाटू नये अशी काळजी घेतली आहे. कोणा बड्या संशोधकाच्या मताचा आश्रय घेण्याचीही येथे जरूरी रहात नाही. अशा मांडणीत संकेतार्थ आपोआपच प्रकाशात येतो. व ते अर्थ एकमेकांना पूरक-पोषक होतील अशा स्वरूपाचे विवरण होईल अशी शक्यतो दक्षता बाळगली आहे.

अदिति-विष्णू, अदिति-रुद्र, अदिति-मरुत्, पृश्नि-रुद्र, पृश्नि-मरुत्, अंबा-रुद्र या साऱ्या संबंधातही, आपः रस तत्त्वाधिष्ठित दैवते आहेत; ही गोष्ट वेदातील आधारवाक्यांनीच निश्चित होत आहे. वेदामध्ये पृश्नि, अंबा यांच्यापेक्षा अदितीचे उल्लेखच विपुल आहेत. अदितीचा पति रुद्र असे सूचित करणारा एकच उल्लेख ऋग्वेदात आहे. ( VIII. १०१. १५ ) अदितीला विष्णुपत्नी असे कल्पिलेलाही एकच उल्लेख यजुर्वेदात आहे ; अदितीबरोबर रुद्र व विष्णू यांचा संबंध जोडणारी कथा निर्माण होते. यावरून त्याकाळी अदितीदेवीच अद्वितीय समजली जात असावी असे ध्वनित होते. अदिती 'देवमाता' असे ऋग्वेदात काही ठिकाणी वर्णिले आहे.

**देव–जननीचा पती** म्हणविणाऱ्या पुरुष दैवतालाही महोन्नत प्रतिष्ठा प्राप्त होण्याची शक्यता आहेच ना ? म्हणून अदितीच्या नावाशी रुद्र व विष्णूचा 'पति' या नात्याचा संबंध जोडण्याचे प्रयत्न-प्रारंभ झाल्याचे येथे उघडकीस येते. पती म्हणून रुद्राचे किंवा








विष्णूचे नाव अदितीशी जोडणाऱ्या कथा अपवादात्मक ( एकेकच ) आहेत. म्हणून या कथा मागाहून प्रचारात आल्या असे म्हणावे लागते. पण या अनुमानाला आधार कोणता ? हे अनुमान साधार आहे का निराधार आहे याबद्दलच्या निर्णयासाठी आता अदिति व अंभृणि या देवींच्या कथांची तुलना आवश्यक होत आहे.

## अदिति व अंभृणि यांच्यातील साम्य

या उभय देवता आपल्या विशेष गुणांनी जशा भिन्न आहेत, तशा काही . गुणांत समान स्वरूपीही पण आहेत. यामुळे वेदातील अदितीचे वर्णन आठवताना, वेदातच आलेल्या "वागांभृणी" नामक देवीचे वर्णनही दृष्टीसमोर आल्याशिवाय रहात नाही. या देवींच्या अभिव्यक्तीत असणारे मुख्य साम्य असे:–

(१) या उभय देवी आप : रस स्वरूपी आहेत. अदितीच्या मूळ स्वरूपाचे विवरण मागे दोन लेखात आले आहे. अंभृणीचे आप : रस स्वरूप, विवरण करून सांगण्याची गरजच नाही! या देवीने 'स्वयमेवच' ( स्वतःच ) ते जाहीर केले आहे. (२) यांच्यातील आणखी एक साम्य म्हणजे, दोघींचाही नाना पुरुष-देवतांच्या बरोबर आढळतो. अदिती ही केव्हाही अनेक देवांच्या परिसरात आढळते; ती एकटी क्वचितच दिसते. अदितीच्या नाना सांगातींच्या परिचयाकरिता नगुन्यादाखल, पुढील तीन ऋचा पहा–

(१) अग्निरिन्द्रो वरुणो मित्रो अर्यमा वायुः पूषा सरस्वती सजोषसः।
आदित्या विष्णुर्मरुतः स्वर्बृहत् सोमो रुद्रो **अदितिः** ब्रह्मणस्पतिः ॥ १०. ६५ · १५॥

(२) इन्द्रो वसुभिः परि पातु नो गयम् आदित्यैर्नो **अदितिः** शर्म यच्छतु।
रुद्रो रुद्रेभिः देवो मृळयाति नः त्वष्टा नो ग्नाभिः सुविताय जिन्वतु ।। १०.६६.३ ।।

(३) अदितिः द्यावापृथिवी ऋतं महत् इन्द्राविष्णू मरुतः स्वर्बृहत् ।
देवान् आदित्यान् अवसे हवामहे वसून् रुद्रान् सवितारं सुदंससम् ॥ १०.६६.४.॥

ऋग्वेदातील प्रमुख दैवतांपैकी, साधारणपणे सर्वांबरोबर अदिती वावरत असलेली दिसते.

अंभृणि देवीही, अदितीप्रमाणेच नाना दैवतांच्या मेळाव्यात आहे. भगवती अंभृणीच, हे पुढीलप्रमाणे प्रकटपणे सांगत आहे :

(१) अहं रुद्रेभिः वसुभिः चरामि, अहम् आदित्यैः उत विश्वदेवैः ।
अहं मित्रावरुणोभा बिभर्मि; अहम् इन्द्राग्नी, अहं अश्विनोभा ॥१०,१२५,१ ॥

(२) अहं सोममाहनसं बिभर्मि; अहं त्वष्टारं उत पूषणं भगम् ।

अदिति व अंभृणींच्या या वर्णनावरून इंद्र, वरुण, अग्नि इत्यादी ज्येष्ठ व श्रेष्ठ अशा देवांशी, अदिती व अंभृणी या दोघींचीही जवळीक होती, असे दिसून येते. परंतु या जवळिकीत असलेले तारतम्य अभ्यसनीय आहे. आपणही त्या निरनिराळ्या देवांतीलच एक, अशा प्रकारे त्यांच्यात मिळून राहणारी अशी अदिती; तर निरनिराळी दैवते आपणास अनुसरीत आहेत असे आपले वर्चस्व दाखविणारी अंभृणीदेवी आहे. या पार्श्वभूमीवर अदितीचा सौम्यपणा उठून दिसतो.

आणखी एक गोष्ट म्हणजे अदितीच्या सवंगड्यात, अंभृणीपेक्षा, काही महत्त्वाच्या दैवतांची नावे जास्त आढळतात. उदा:– ब्रह्मणस्पति, सविता, सरस्वति . . . इ. या सर्वांपेक्षा अंभृणीच्या जोडीदारात विष्णूचा अनुल्लेख, प्रकर्षाने उठून दिसतो.

अदिती व अंभृणी या दोघी नाना दैवतांबरोबर असतात, हे खरे; पण त्या दैवतांबरोबर वागण्याचा त्यांच्यातील फरक दुर्लक्षिल्यास, या दोघी देवींच्या वैशिष्टयांचे औचित्य लक्षात येणार नाही. दोघींच्या आविर्भावातील या फरकामुळेच , या देवता–प्रकाराच्या अभिव्यक्तीतील औचित्य व सौंदर्य नजरेत भरते.

ऋग्वेदातील कवीने, या दोन्ही देवींमध्ये सार्वकालिक महत्त्वाचा असा एक फरक सूचित केला आहे. कवीच्या त्या वर्णन–तारतम्यातून, दोघींच्या मनाच्या ठेवणीतील हे अंतर, अंभृणीच्या आवेशयुक्त वाणीतून जाणवते. अंभृणीचे सूक्त, फक्त एकच असले तरी, त्याचे भावनिक सूक्ष्म तरंग, आजही जाणवतात. देवीच्या अभिषेकात श्रीसूक्ताप्रमाणे अंभृणी–सूक्त–पठणाची परंपरा, काही








संप्रदायात आजही रूढ आहे. ऋग्वेदाच्या दहाही मंडलात अदिती देवीचे नाव वारंवार येते; तरी तिने उच्चारलेला एक शब्दही तेथे कुठेही कानी येत नाही ! मित्रा–वरुणांसारख्या सम्राटाची माता म्हणून गाजत असलेल्या या राजमातेच्या वाट्याला एकही पूर्ण सूक्त नाही ! एखाद-दुसरी ऋचाच फक्त, तिच्या वाट्याला आलेली आहे. पण एकाच एका सूक्तातील अंभृणीच्या वर्णनातील काय ती ओजस्विता ! या ओजस्वी तेजसाची प्रखरता अल्पांशानेही अदितीत कुठेही व्यक्त होत नाही ! अदिती ही विश्वजननी; विश्वपोषयित्री देवी ! ही लोकमाता आहे. मातेचे वैशिष्टय बोलण्यात नसते. अंभृणीची, ती धीर गर्जना, व तिचा तो आवेश, ही देवी विशुद्ध "आदिशक्ती" विश्वशक्ती असल्याची खात्री पटवितो. अदिती व अंभृणी यांच्या बैठकीतील हा फरक लक्षात घेतला तरच या उभय देवतांच्या वर्णनातील स्वारस्य उमजेल व या वर्णन-सौंदर्याचा आस्वाद घेता येईल.

## अदितीचे मातृसौंदर्य

"यत् जातम्, यत् जनित्वम्" हे सारे काही अदिती ! सृष्टीमध्ये जे काही घडले आहे, व पुढे जे घडणार आहे, त्या साऱ्याला 'मूळ कारण' अदितीच होय. ही "अमृतस्य नाभिः" आहे; तसेच ही 'गो' रूपधरा आहे व आपले क्षीरामृत पाजून (विश्वाचे) पोषण करण्यात तन्मय झालेल्या मातेस, शब्दाची जरूरी ती काय ? लोक-कल्याणकारक मंगल कृती हेच अदितीचे वैशिष्टय, हीच तिची भाषा ! माता म्हणजे मूर्तिमंत प्रेम; माता ही वात्सल्याची मूस, मुलांच्या खोड्या, अवज्ञा, उद्धटपणा हे सारे ती सहन करते; मुलांचे अपराध पोटात घालणे, हा तिचा स्थायीभाव आहे. '**सर्वं–सहा,**' ही माता, 'धरित्री' आहे. अदितीला पृथिवीदेवी असेही कल्पिणाऱ्या ऋग्वेदाच्या कवींची प्रतिभा कौतुकास्पद आहे. पृथिवीस्वरूप अदितीला कवीने एके ठिकाणी (I. ७२, ९) पुढील प्रमाणे वर्णिले आहे. "महद्भिः पुत्रैः (सह) माता अदितिः पृथिवी, महान् वितस्ते" [महान् कर्तृत्वशाली पुत्रांबरोबर पृथिवी (–रूप) अदिति, महान वैभवाने उभी आहे.]

विश्वाची आई. या महानतेमुळे अदिति ही भू-देवी झाली आहे. देवमाता या भूमिकेवरून अदिति 'द्यौः' (द्युलोक) ठरते.

"इयं (पृथिवी) वा अदितिः महि" (यजु, ११, ५६); हा उल्लेख शतपथ–ब्राह्मणातही येतो. "इयं (पृथिवी) वै दैव्यदितिः विश्वरूपी" (तैत्तिरीय ब्राह्मण १, ७, ६, ७), अदितीला 'विश्वस्य भर्त्री जगतः प्रतिष्ठा' असेही म्हटले आहे.

'विश्वस्य भर्त्री जगतः प्रतिष्ठा' असलेली लोकधात्री अदिति देवी, आपल्या कर्तृत्वशाली मुलांबरोबर वैभवाने (महान्) उभी आहे. या पृथिवीरूप अदितीलाच ऋग्वेदाच्या कवीने, (अंतरिक्षात अनंताकडे प्रयाण करणारी) नौका असे कल्पिलेले एक अत्यंत मनोज्ञ रूपक आहे. हे कल्पिण्यांत त्या कवीची सहृदयता व विश्वव्यापक विशाल दृष्टी व्यक्त होत आहे. लोकधारक (विशाल) धरणीला नौका असे कल्पिलेल्या या वर्णनात 'पृथिवी' हा संकेत विशालत्व-सूचक श्लिष्टार्थदायक होईल अशा रीतीने केलेला हा पदप्रयोग, हृद्य आहे. पृथिवी–रूप 'अदिति' देवीचे नौकारूप वर्णन पुढीलप्रमाणे आहेः–

सुत्रामाणं पृथिवीं द्यां अनेहसं
सुशर्माणं अदितिं सुप्रणीतिम् !
दैवीं नावं स्वरित्रां अनागसं अस्रवन्तीम्
आरुहेम स्वस्तये ॥ १०,६३,१० ॥

या ऋचेत अदितीला "दैवीं नावम्" (दिव्य नौका) म्हणून कल्पिले आहे. मातृप्रेमाच्या आधाराशिवाय या संसार–सागरातून तरून जाणे शक्य नाही असे येथे सूचित केल्याचे आढळते. या रूपकात या विश्वधात्री मातेला, दिव्य–नौका कल्पिली आहे. या दिव्य नौकेचा महिमा व तिची घनता स्पष्ट करणारे, यातील प्रत्येक विशेषण, 'अदिति'-रूपी मातृ–दैवताच्या मंगलमय कल्याणकारक प्रशांत सौंदर्याची खात्री पटवीत आहे :

ही दिव्य नौका कशी आहे? तर सर्वांचे रक्षण करणारी ! (सुत्रामाणम्); सर्वांना पुरेशी, विस्तृत आहे. (पृथिवीम्) म्हणून अतुलनीय अशी (अनेहसम्), व सुखकारक, (सुशर्माणम्), निर्वेधपणे पुढे नेणारी (सुप्रणीतिम्) अशाप्रकारे सुसूत्र पुढे नेणारी ही नौका, चांगली वल्ही असणारी (स्वरि-










त्राम्) व आघाताने न फुटणारी (अनागसम्) पाणी आत शिरण्यास छिद्र नसलेली (अस्रवन्तीम्), अशा ह्या द्युतिमंत (द्याम्), अदितिरूपी नौकेत (अदितिम् दैवीं नावम्) आमच्या स्वास्थ्य व कल्याणासाठी, सुखासाठी (स्वस्तये), आरोहण करू या. (आरुहेम).

लोकजननी भूदेवीची म्हणजे अदितीची, श्रद्धा व भक्तीने उपासना करून तिचा आश्रय घेणाराला इह–पर या दोन्हीचा लाभ होतो. सर्वतोभद्र कल्याण-मय शुभ मंगलकर अशी ही अदितिरूपी नौका आहे. ती मानवाला मध्येच कुठेही (पाण्यात) पडू न देता संभाळून पैलतीरी नेते, असा विश्वास वाटण्याजोगा अर्थ, यातून ध्वनित होतो. या लोकधात्री अदितीविषयी भक्तांची श्रद्धा दृढ होईल असे अमोघ सामर्थ्य, या ऋचेत आहे. असा आहे हा मंत्र !

विश्वजननी अदितीदेवीचे मातृ–सौंदर्य हे अशा प्रकारचे आहे. वीर अंभृणीचे व्यक्तिमत्त्व याहून फार निराळ्या स्वरूपाचे आहे.

## तेजस्विनी वीरा : अंभृणिदेवी

मातृ-सौंदर्यामुळे अदितीचा तोंडावळा गौरी, उमा, पार्वती यांच्याशी मिळता-जुळता आहे. अंभृणी, आपल्या उग्र, निष्ठुर सत्यवादी भूमिकेमुळे चंडी, दुर्गा, काली यांच्या जवळची वाटते. प्रखर व्यक्ति-मत्त्वाच्या या अंभृणी देवीचा जवळून परिचय करून घेणे धाडसाचेच वाटेल; परंतु सुदैवाने, पामर नरास, या साहसास उद्युक्त होण्याची आवश्यकता, या देवी भवानीने ठेवलेली नाही! ही देवी स्वतःच आपले आत्मचरित मोकळेपणी जगास जाहीर करीत आहे. या प्रकारची आत्मचरित्रात्मक सूक्ते ऋग्वेदात अगदीच विरळा ! अशा प्रकारच्या दुर्मिळ आत्म-प्रकटीकरणातसुद्धा हे सूक्त आपल्या काही विशेष गुणांनी अनन्यसाधारण बनले आहे! विश्व व्यापूनही 'दशांगुळे' उरणाऱ्या विराट् पुरुषोत्तमाचे सूक्तही ऋग्वेदात आहे. ( X, ९०.) परंतु अंभृणि-सूक्तातील घनगंभीर गर्जनेसमोर पुरुषोत्तमाचे वर्णनही फिके वाटते.

'अहमेव स्वयम् इदं वदामि,' असे आवेशाने गर्जणाऱ्या या देवीची त्या देवलोकातील ती दिव्य-वाणी, भूलोकी मानवांना कशी कळली ? ही दैवी वाणी ऐकणे, मर्त्यांना कसे शक्य झाले? असा प्रश्न पुढे येतो. आणि ही देवी 'स्वतःच सांगते', याचा अर्थ काय ? भक्तांच्या अंगात येऊन देवी बोलते, अशी श्रद्धा आजही भारतात सर्वत्र आहे. देव किंवा देवी अंगात आल्याची दृश्ये आजही अनेक देवळातून पहावयास मिळतात. हा एक प्रकारचा संकेत 'समय' ठरल्यासारखा आहे, काही पूजा, जत्रा इत्यादीतून. प्रस्तुत देवी स्वयं बोलते याबद्दल ऋक् भाष्यात श्री सायणांनी सांगितलेला कथाभाग पुढीलप्रमाणे आहे :

'अंभृणस्य महर्षेः दुहिता वाक्नाम्नी ब्रह्मविदुषी' होती. (अंभृणी) ती "स्वात्मानं स्तौति" असे म्हटले आहे. परंतु ही मानवी अंभृण-ऋषिकन्येची 'आत्मस्तुति' नव्हे, हे, 'शक्ति-देवी' प्रादु-र्भावसूचक 'बोल' आहेत. ज्ञानाच्या सिद्धा-वस्थेतील विश्वात्मभावाचे बोल व देवताआवेशाच्या भूमिकेतील बोल, हे दोन्ही प्रकार भिन्न आहेत. पहिल्यात विश्वतत्त्वच जणू प्रशांतपणे बोलत असते; तर दुसऱ्यात एक विशिष्ट देवताशक्ती आवेशान बोलत असते. हे दोन्ही प्रकार ऋग्वेदा-तील याजक संप्रदायाच्या वैचारिक चौकटीत बसत नाहीत. परंतु मूळ याजक संप्रदाय 'आप : रस' संप्रदायाच्या प्रभावात बदलू लागतो. व "अप्सु-ज्योतिः ज्योतिष्यापः" दृष्टीचा एक नूतन समन्वय-वादी पंथ प्रचलित होतो. याला क्रमाने मान्यता मिळू लागल्याचे दिसते. ऋग्वेदातील वामदेवाचे विचार याचे उत्तम उदाहरण म्हणता येईल. (IV.१८, व ५८.) ऋग्वेदात दिसू लागलेली ही नूतन विचारधारा, गीतेत आणखी जास्त समंजस, व सुभग वाटणाऱ्या पद्धतीत, उच्च बौद्धिक पातळी-जवळ येऊन आविष्कार पावते.

श्री सायणांनी दिलेल्या कथेप्रमाणे, 'अंभृण' ऋषीची मुलगी म्हणून या देवीला 'आंभृणी,' असे नाव रूढ झाले असा ग्रह होण्यास जागा आहे; शिवाय या कथाभागाने या सूक्ताची पार्श्वभूमी, पुरेशी स्पष्ट होत नाही. त्या ऋषिकन्येचे नाव 'वाक्' होते, असे ती कथा सांगते. या सूक्तातील देवीच्या 'वागांभृणि' या नावाची पार्श्वभूमी

स्पष्ट करण्यासाठी, ही कथा रचलेली दिसते. पण अशाने 'अंभृण' ऋषीच्या नावाला महत्त्व येत असल्यामुळे या देवीच्या खऱ्या स्वरूपाचे सरळ 'दर्शन' घडत नाही! या अंभृणीला, (केवळ) 'वाक्' देवी असे म्हणण्यातही विशेष औचित्य नाही. ('सरस्वती' देवीच्या समीक्षेत हे स्पष्ट होईल.) अंभृणीची ही बैठक प्रामुख्याने 'वाक्' (विद्या) देवीची नाही, मुख्यत: 'शक्तीचा' हा आविष्कार आहे. "वागांमृणी" नावामुळे या देवीचे खरे स्वरूपदर्शन होण्यास बाध येतो. यापेक्षा केवळ 'अंभृणी' हे एकटेच नाव, या देवीला पुरे आहे. कारण, 'अंभृणी' या नावात या देवी–नाम-रहस्याचे सारसर्वस्व भरले आहे. अंभस्–अंभृण शब्द–मुळात अंबु हा जलवाचक अर्थ आहे. "**मम योनिः अप्सु अंतः समुद्रे**" असे ही देवी 'स्वयमेवच' सांगते! म्हणूनच या 'अंभस्' (आप) तत्त्वाधिष्ठित देवीला भगवती अंभृणी, म्हणण्यातच औचित्य आहे. कोणा एका 'अंभृण' नामक व्यक्तीमुळे ही देवी 'अंभृणी' होण्याची जरूर नाही. अंबेमुळे अंबुराव; एल्लम्मा वरून, एल्लणभट, जल्हण, ही नावे प्रचलित होती; व आहेत. तसे अंभृणीमुळेच 'अंभृण' हे असे त्या ऋषीचे नाव प्रचारात आले असणे शक्य आहे. घराण्यातील मुला–मुलींना, कुलदैवतांचे नाव ठेवण्याची ही प्रथा, प्राचीन आहे; यामुळे अंभृणी या देवी–नामाची पूर्व पीठिका कळण्यास सायणांची कथा, विशेष उपयुक्त होत नाही. पण, ही देवी, एका (कुमारी) मुलीच्या अंगांत संचरल्या वेळचे हे वक्तव्य आहे, ही सूचना मिळण्यास सायणांची ही कथा अत्यंत उपयोगी आहे यात शंका नाही. 'अंभृण–पुत्री' म्हणण्यात ती अविवाहित असल्याची सूचना आहे.

भगवती अंभृणीचे संपूर्ण वैशिष्ट कळण्यास या सूक्तातील प्रत्येक ऋचेचा, त्यातील खाचा खोचा-सकट अर्थ चांगल्या रीतीने जाणणे जरूर आहे. या संपूर्ण सूक्ताचे मनन व समालोचन करण्यापूर्वी सध्या एवढेच म्हणता येईल की, या भगवती अंभृणीचे पाणी, श्री अदिति देवीपेक्षा जास्त उग्र व तेजस्वी आहे. या पाण्यात संरक्षक शक्तीप्रमाणे, संहारक सामर्थ्यही सामावलेले असल्याची स्पष्ट सूचना सूक्तात आहे. म्हणून अंभृणी देवी अदितीपेक्षा, (जास्त) 'अखंडित' 'समग्र' देवता वाटते. म्हणून 'अमृतं चैव मृत्युः च' या उभय शक्ती, या भगवतीत एकत्रित आहेत, असे म्हणावे लागते. मंथनापूर्वीचे आदि आप: रसच होय, या देवीचे हे पाणी! या अर्थाने, ही अंभृणी "यस्य छाया अमृतं यस्य मृत्युः" अशी समर्थ 'क' नामक देवाची पत्नी 'का' नामक देवी ठरते. तरी पण पुराणां-तरीच्या कालीचे दर्शन होईपर्यंत, खऱ्या 'समग्र' 'अखंडित' देवीची कल्पना येणे शक्य नाही. मूळ 'का' देवी म्हणजे दुर्गाकालीच होय.

ऋग्वेदातील 'कस्मै' देवता सूक्तावरून, मंथन-पूर्व आदि आप: रसाची, तत्कालीन कवींना पूर्ण जाणीव होती, हे निश्चित आहे; आणि या आप:रसात 'अमृत' व 'मृत्यु' या दोनही शक्ती संमिश्र आहेत; याचेही सम्यक् ज्ञान त्याना होते, ही गोष्टही तितकीच निश्चित आहे. ऋग्वेदकालीन कवीची 'आपो याचामि भेषजम्' व 'शिवतमो रस:' या विषयीची आस्था व ओढ पाहता ऋग्वेदकालीच मूल आदि: आपाचे पृथक्करण होऊन, 'मृत्यू' रूपी संहारक आप: रसापासून, शिव तमो रस' वेगळा केला जातो; व विशेषेकरून शिवतमोरसाची उपा-सना होऊ लागली. व आप: रसातील संहारक भागाचे दुरूनच वंदन व पूजन चालू झाले. पण ऋग्वेदकाळीच शेवटी 'समग्र' आदि–आपाविषयीही पूज्य बुद्धी वाढू लागल्याचे दिसते. शेवटी दहाव्या मंडळात (वेदकाळीच) 'कस्मै' देवा प्रमाणे अंभृणी देवीही प्रतिष्ठित होऊ पहात असलेले वेदांत स्थान मिळालेल्या या देवतासूक्तांवरून उघड होत आहे; सौम्य अदितिमातेच्या जागी, उग्र मंगला अंभृणी येण्याची चिन्हे दिसू लागतात. जिच्या पुढे सर्व पुरुष–दैवतेही हतप्रभ वाटतात, त्या देवी अंभृणीच्या पूर्ण परिचयाकरिता, या देवीच्या मुखानेच तिचे आत्मचरित्र जाणावे हेच बरे.

---










श्री. प्र. रा. देशमुख

# ऋग्वेदातील नद्या

ऋग्वेदात वर्णन असलेल्या आर्यांच्या कार्यक्षेत्राबद्दल फार वाद होता. परंतु सिंधु संस्कृतीचे उत्खनन झाल्यापासून हा वाद जवळ जवळ नाहीसा झाला आहे. कारण ऋग्वेदात वर्णन असलेली आर्यांनी विनाश केलेली हरियुपीया आणि दुर्योण म्हणजे हरप्पा आणि मोहेंजोदारो ही शहरे जवळ जवळ त्याच नावाने भारतात उत्खनित झाली आहेत. ऋग्वेदात आर्यांनी जी पुर निवाची शहरे जाळली. त्यांच्या ऋचेतील वर्णनाशी व उत्खननातील माहितीशी भयंकर साम्य आहे. ऋग्वेदात वर्णन असलेल्या आर्यांच्या शत्रूचे व सिंधु संस्कृतीतील लोकांचे रंग, रूप, उद्योगधंदे, सांपत्तिक स्थिती, समुद्रावरील व्यापार, तटबंदीची शहरे असणे, देव धर्म इत्यादी बाबतीत इतके विलक्षण साम्य आहे की ते दोघेही एकच आहेत याबद्दल बिलकूल संशय उरत नाही. ऋग्वेदातील आर्यांच्या शत्रूंच्या माहितीशी सिंधु-उत्खननातील माहितीशी तुलना करून ऋग्वेदातील आर्यांच्या शत्रूंचे सिंधूलोकाशी ऐकात्म्य आपण इतरत्र संशयापलीकडे सिद्ध केले आहे. आता बहुतेक सर्व पाश्चात्त्य आणि भारतीय विद्वान सिंधु-लोकच वेदात वर्णन असलेले आर्यांचे शत्रू होत असे मानतात.

तसेच ऋग्वेदाबद्दलही अगदी अलीकडच्या काळापावेतो ज्या काही चुकीच्या समजुती प्रसृत होत्या त्या पैकी ऋग्वेदातील ऋचा भारताबाहेर लांबच्या प्रदेशात फार प्राचीनकाळी रचल्या गेल्या ही एक होय. खरी परिस्थिती तशी नाही. ऋग्वेदात संकलित केलेल्या ऋचा आर्य भारतात येऊन त्यांनी सिंधुलोकाशी दीर्घकाळपर्यंत संघर्ष करून त्यांच्या शहरांचा विनाश केल्यानंतर अनेक शतकांनी भारतात रचल्या गेल्या आहेत. आर्यांच्या सिंधुलोकांशी झालेल्या संघर्षाचे वर्णन ऋचात असल्यामुळे त्या संघर्ष होऊन गेल्यावर रचल्या गेल्या हे पर्यायानेच येते. तसेच हे सर्व संघर्ष भारतातच झाल्यामुळे ऋचाही भारतातच झाल्या हे निश्चित. ज्या भूमीत हे संघर्ष झाले आणि जिचे वर्णन ऋचात आहे ती भारतच आहे हे ऋग्वेदात वर्णन असलेल्या नद्या, शहर, लोक इत्यादींवरून आपण इतरत्र पाहिले. येथे ऋग्वेदातील नद्यांचा विचार करून त्या सर्व भारतातीलच आहेत हे दाखवावयाचे आहे. तसे करण्यापूर्वी काही गैरसमज दूर करणे आवश्यक आहे.

### डॉ. ज्वालाप्रसाद सिंघल यांचे म्हणणे --

डॉ. ज्वालाप्रसाद सिंघल यानी The Sphinx Speaks नावाचे पुस्तक सन १९६३ मध्ये प्रसिद्ध केले. त्यांचे विचार भारतीय व पाश्चात्य विद्वानांना कळावे म्हणून या पुस्तकाच्या प्रती त्यांनी दिल्लीस भरलेल्या विश्वप्राच्य परिषदेच्या सभासदांना दिल्या. त्यात प्रस्तुत लेखकालाही एक प्रत देण्यात आली. या पुस्तकातील विचार भारतीय व पाश्चात्त्यांपैकी कोणालाही न पटण्यासारखे असल्यामुळे त्याची दखल घेतली गेली नाही. आता ते आपल्या विचाराचा प्रचार व्याख्यानद्वारा करीत आहेत. नुकतेच त्यांचे पुण्यास व्याख्यान झाले आहे. वरील पुस्तकात आर्यांसंबंधी त्यांनी जे प्रतिपादिले ते अगदी थोडक्यात असे : - " आर्य पाच लक्ष वर्षापूर्वी भारतात होते. त्या वेळी आर्य सप्तसिंधूच्या प्रदेशात होते. हा प्रदेश दख्खनचे पठारापासून वेगळा होता. मधल्या गंगेच्या मैदानात, राजपुतान्यात व सिंधमध्ये समुद्र होता. ऋग्वेदाची रचना पाच लक्ष वर्षापूर्वी झाली. इतक्या प्राचीन काळी द्राविडिअन लोक भारतात नव्हते म्हणून त्यांच्याशी आर्यांचे युद्ध संभवत नाही. आर्यांचे युद्ध बिळात राहणाऱ्या रानटी लोकाशी झाले. "

### डॉ. सिंघल यांचे म्हणणे अशक्य, असंभाव्य आणि चुकीचे

डॉ. सिंघल यांनी वरील पुस्तकात जे तंत्र अवलंबिले आहे ते असे : भूगर्भशास्त्रातून मिळणारी भारताबद्दलची प्राचीनतम माहिती आपल्या कल्पनेने पुराणाशी व इतर प्राचीन माहितीशी जोडून प्राचीन भारताचे एक असंभाव्य व काल्पनिक चित्र बनविले आहे.






त्याचा वस्तुस्थितीशी, शास्त्रीय ज्ञानाशी, उत्खननातील माहितीशी अथवा ऋग्वेदातील माहितीशी बिलकूल संबंध नाही. इतकेच नव्हे तर संभवासंभाव्यता अथवा शक्याशक्यतेचाही संबंध नाही. कालमापनालाही अर्थ उरला नाही. त्यामुळे त्यांचे लिखाण असंभाव्य, काल्पनिक व अद्‌भुत झाले आहे. भूगर्भ शास्त्राप्रमाणे पाच लक्ष वर्षांपूर्वी कदाचित् गंगेच्या मैदानात, राजपुतान्यात व सिंधमध्ये समुद्र असेलही परंतु तितक्या प्राचीनकाळी आर्य तेथे होते आणि त्यानी त्याकाळी त्या प्रदेशात ऋचांची रचना केली याला काहीही पुरावा नाही. ऋग्वेदाचा पुरावा अगदीच उलट आहे. ऋग्वेदात वर्णन असलेले आर्य आणि ऋचा रचणारे त्यांचे वंशज ज्या प्रदेशात राहात होते तो आज असलेला सिंध राजपुताना गंगेचे मैदान असलेला भारत होय. या प्रदेशावर समुद्र असलेला भारत नव्हे. ऋग्वेदातील नद्यांचा विचार करून तेच दाखवावयाचे आहे. म्हणजे डॉ. सिंघल यांचे सर्व विचार आपोआपच कोलमडून पडतात.

शिवाय डॉ. सिंघल म्हणतात त्याप्रमाणे ऋग्वेदातील आर्यांचे शत्रू बिळात राहणारे रानटी लोक नव्हते. ते तत्कालीन लोकात अत्यंत समृद्ध आणि सुधारलेले, तटबंदी, खंदक आणि दरवाजे असलेल्या शहरात राहणारे, समुद्रावरून दूरवर व्यापार करणारे ज्यांचे या सर्व बाबतीत आणि रंग, रूप, स्वभावरचना, सांपत्तिक स्थिती, उद्योगधंदे, देव धर्म, पूजापद्धती, शिंगे धारण करणे, जिभेला चिरा देणे, तीन तोंडाच्या देवाची व लिंगपूजा करणे इत्यादी बाबतीत सिंधुलोकांशी ऐक्य असलेले सिंधुलोक होते हे आपण ऋग्वेदातील माहितीची सिंधुउत्खननातील पुराव्याशी तुलना करून इतरत्र सिद्ध केले आहे. सिंधुसंस्कृतीचा शोध लागण्यापूर्वी यांनाच वेदाचे पाश्चात्त्य अभ्यासक बिळात राहणारे रानटी लोक म्हणत होते. डॉ. सिंघल यांनी तीच पाश्चात्त्यांची अतीत काल झालेली, त्यांनी टाकून दिलेली अज्ञानजन्य कल्पना घेऊन आपले काल्पनिक लिखाण सजवले. ते ऋग्वेदाच्या पुराव्याच्या अत्यंत विरुद्ध आहे. ऋग्वेद पाच लक्ष वर्षांपूर्वी निर्माण झाला म्हणून तर डॉ. सिंघल यांनी ऋग्वेदाचा काल भरमसाट सांगणारांचे सर्व विक्रम मोडले आहेत.

## ऋग्वेदातील नद्यांचा प्रदेश

ऋग्वेदातील नद्यांचा वेगवेगळा विचार करण्यापूर्वी त्या ज्या प्रदेशातून वाहतात त्यांचा सामान्यत्वे विचार करू. ऋग्वेदातील नद्या प्रामुख्याने ज्या प्रदेशातून वाहतात ते मुख्यत्वे राजपुताना, सिंध, पंजाब, काबूल आणि गंगायमुनांचे मैदान होय आणि मुख्यत्वे हाच भाग ऋग्वेदात वर्णन असलेल्या आर्यांची कार्यभूमी होय.

## राजपुतान्याचा वायव्य भाग

राजपुतान्याच्या वायव्य भागात हल्ली वाळवंट आहे. ऋग्वेद काळी ह्या भागात वाळवंट नव्हते तो अत्यंत सुपीक आणि समृद्ध होता. त्या भागातून घग्गर आणि हाक्रा या नावाने ओळखली जाणारी सुकलेली सरस्वती दिसते ती सुकलेली नसून फार महत्त्वाची आणि श्रेष्ठ नदी होती. ऋग्वेदातील प्रथम श्रेष्ठ आणि पवित्रतम नदी सरस्वती होय. ही व्यापारी दृष्ट्या फार उपयुक्त असून पणी व्यापारी आपला व्यापार फार दूरवर याच नदातून करीत होते. हा सर्व सुपीक आणि समृद्ध भाग पणी व्यापाऱ्यांच्या ताब्यात होता. ते सरस्वतीतून फार दूरवर व्यापार करून खूप नफा मिळवीत. सरस्वतीच्या तीरावर पणींची तटबंदीची शहरे होती. हा प्रदेश वध्यश्वाचा मुलगा ऋग्वेदातील सुप्रसिद्ध दिवोदास याने पणींच्या ताब्यातून जिंकून घेतला. त्याचे वर्णन ऋचा ६-६१-१[१] मध्ये आहे. तिचा अर्थ असा : "ह्या सरस्वतीने हविर्दान करणाऱ्या वध्र्यश्वाला वेगवान आणि पितरांचे ऋण फेडणारा दिवोदास नावाचा मुलगा दिला. जिने शाश्वत काल राहणाऱ्या आपमतलबी पणीला खणून काढले त्या सरस्वतीची दाने पुष्कळ आहेत." आर्य प्रथम ह्याच भागात आले व तेथे त्यानी वस्ती केली. आपले मनुष्यबळ व द्रव्यबळ वाढविले व पणींचा पराभव करून सरस्वती आणि दृशद्वतीच्या मध्ये सर्व प्रथम आर्यांच्या राज्याची ब्रह्मावर्ताची स्थापना केली. ही स्थापना इ. स. पूर्वी ३१०२ ह्या

---

१. इयमदाद्रभसमृणच्युतं दिवोदासं वध्र्यश्वाय दाशुषे ।
या शश्वन्तमाचखादावसं पणिं ता ते दात्राणि तविषा सरस्वति ॥ ६-६१-१








वर्षी झाली असावी. येथूनच पुढे जाऊन आर्यांनी पणींशी दीर्घ काळपर्यंत संघर्ष करून त्यांची तटबंदीची शहरे फोडली व फार मोठ्या प्रमाणावर त्यांच्या कत्तली केल्या. ' ब्रह्मावर्त ' आर्यांचे सर्व प्रथम राज्य असल्यामुळे हा प्रदेश अखिल भारतात परम पवित्र मानला जातो. मनुस्मृतीत त्याचा पवित्र देशांच्या वर्णनात सर्व प्रथम उल्लेख आहे तो असा : " सरस्वती आणि दृशद्वती यांच्यामधील देवनिर्मित प्रदेशाला ब्रह्मावर्त म्हणतात. त्या देशात जो वर्णांचा आणि संकीर्ण जातींचा परंपरागत आचार आहे त्याला सदाचार म्हणतात. "

### उत्खननातील पुरावा

आर्यांनी प्रथम राजपुतान्यातील वायव्य भागातच वस्ती केली यासंबंधी उत्खननात अत्यंत महत्त्वाचा पुरावा उपलब्ध झाला आहे. सरस्वतीच्या तीरावर सिंधुशहरांची एक रांगच्या रांग उपलब्ध झाली आहे. भारतात इतरत्र कोठेही न आढळणारा पुरावा या भागात उपलब्ध झाला आहे. हा पुरावा आर्यासंबंधी अत्यंत महत्त्वाचा पुरावा आहे. सिंधु शहरांच्या अवशेषावर इतरत्र आर्यांच्या वसाहतींचे अवशेष आढळतात. सिंधु संस्कृतीच्या मागून रंगीत करड्या रंगाची मातीची भांडी वापरणाराची ( Painted grey Ware) संस्कृती आढळते ही संस्कृती आर्यांची आहे असा उत्खनन करणारांचा निश्चित समज आहे ही संस्कृती इतरत्र सिंधुशहरांच्या अवशेषावर आढळते. परंतु सरस्वतीच्या तीरावर मात्र ही संस्कृती सिंधु शहरापासून दूर वेगळ्या ठिकाणी आढळते. त्यावरून एक गोष्ट अगदी निश्चित दिसते ती ही की इतरत्र ही संस्कृती सिंधु संस्कृतीचा विनाश झाल्यावर आलेली दिसत असली तरी सरस्वतीच्या तीरावर मात्र ती आर्यांच्या समकालीन होती. सरस्वतीच्या तीरावरील सुपीक आणि समृद्ध प्रदेश सिंधुलोकांच्या ताब्यात असून तेथे त्यांची शहरे होती. आर्यांनी याच प्रदेशात प्रथम आपली वस्ती केली ही गोष्ट सिद्ध होते. ऋग्वेदकाळी तेथे समुद्र नव्हता. तेथे सिंधुलोकांची तटबंदीची शहरे होती. आर्यांनी त्यांचा विनाश करून सर्वप्रथम राज्याची ब्रह्मावर्ताची स्थापना केली. सरस्वती हल्ली सुकलेली आहे तिला हाक्रा आणि घग्गर ही नावे आहेत. दृशद्वतीही सुकलेली आहे ती चौटांग या नावाने हल्ली ओळखली जाते. ह्या दोन्ही नद्या सुकल्या असल्या तरी त्यांचे पात्र कायम आहे.

### पंजाब

पंजाब म्हणजे पाच नद्यांचा प्रदेश. परंतु ऋग्वेदात त्याला सप्तसिंधूंचा म्हणजे सात नद्यांचा प्रदेश म्हटले आहे. कारण पंजाबमध्ये सिंधू आणि तिच्या पूर्वेकडील उपनद्यांचा समावेश होतो परंतु सप्तसिंधूच्या प्रदेशात सिंधूच्या पश्चिम आणि उत्तरेकडील नद्यांचाही समावेश होत होता. हे आपण पुढे नद्यांचा विचार करताना पाहू. सिंधुलोक आपली तटबंदीची शहरे नद्यांच्या काठी बांधत, कारण तसे करण्यात बहुविध फायदे होते. सिंधुशहरे मुख्यत: संरक्षणासाठी बांधली असल्यामुळे शहरांच्या तटबंदीच्या सभोवती मोठे खंदक खणून नद्यांचे पाणी त्यांतून घेऊन शहराचे रक्षण करता येत होते. सिंधु शहरे जमीन उंच करून त्यावर बांधली जात होती. अशी शहरे सतलज ( शुतुद्रि ) आणि बियास ( विपाट ) या नद्यांचे काठी उत्खनित झाली आहेत. हरप्पा शहर रावीच्या ( परुष्णि ) दोन शाखांच्या संगमावर उपलब्ध झाले आहे. पंजाब प्रामुख्याने सुपीक आणि पुष्कळ नद्यांचा प्रदेश असल्यामुळे सिंधुशहरे प्रामुख्याने याच भागात जास्त वसली होती व आर्यांचे कार्यक्षेत्रही प्रामुख्याने याच भागात आहे. सिंधूचा आणि इतर नद्यांचे प्रवाह बदलत असले तरी वेदकालातील नद्या प्राचीन कालापासून त्याच नावाने अस्तित्वात आहेत.

### सिंध

सिंधुनदीच्या काठी सिंध प्रांतात मोहेंजोदारो शहर उत्खनित झाले आहे. त्यावरून सिंधुनदी आणि सिंधप्रांत आजच्या प्रमाणेच ऋग्वेदकालीही अस्तित्वात होता असे दिसते.

### गंगायमुनांचे मैदान

ऋचातून गंगा आणि यमुना या दोन्ही नद्यांचे उल्लेख आहेत. गंगा ही भारताच्या प्राचीनतम काळापासून आजपर्यंत सारखीच पवित्र आहे व तिचे नावही तेच आहे. यमुना नदी आणि तिच्या काठी राहणाऱ्या शिग्रू आणि यक्ष लोकाचा उल्लेख ऋचांतून



अनुक्रमणिका






आहे. गंगा आणि यमुना यांचे अस्तित्व ऋग्वेद काळात आजच्याप्रमाणेच होते.

## नदी सूक्त

ऋग्वेदातील १० व्या मंडळातील ७५ वे सूक्त नदी-सूक्त म्हणून प्रसिद्ध आहे. त्यात महत्वाच्या नद्यांचा उल्लेख आला आहे. त्याशिवायही इतर मंडळातून नद्यांचा जागो जागी उल्लेख आला आहे. प्रथम नदीसूक्ताचा विचार करून नंतर इतर उल्लेखाचा विचार करू.

प्रियमेधाचा पुत्र सिंधुक्षित याचे हे नवऋचाचे सूक्त आहे. त्यातील ऋचांचा अर्थ असा :

" हे उदकानो यजमानाच्या गृहात कवी तुमचा उत्तम महिमा वर्णन करतो. नद्या सात सात होऊन तीन प्रकाराने क्रमण करतात. ह्या वाहणाऱ्या नद्यांमध्ये सिंधुनदी आपल्या बलाने सर्वांना मागे टाकते ( १०-७५-१ )[२] हे सिंधू, तुझ्या गमनासाठी वरुणाने मार्ग खणला. म्हणून तू अन्न निर्माण करण्यासाठी गेलीस. तू पर्वतावरील उंच मार्गाने पृथ्वीवर खाली येतेस. म्हणून तू ह्या जगाच्या पुढे दिसतेस ( १०-७५-२ )[३] वृषभाप्रमाणे शब्द करीत जेव्हा सिंधु जाते तेव्हा पृथ्वीवरील आवाज आकाशात जातो. (हिचा) अनंत वेग सूर्याशी स्पर्धा करतो. मेघातून पडणाऱ्या वृष्टी जसा आवाज करतात ( तसा हिचा शब्द प्रादुर्भूत होतो. ) १०-७५-३[४]

हे सिंधू, आईकडे मूल किंवा पययुक्त गाईकडे वासरू तशा ( इतर नद्या ) तुझ्याकडे येतात. युद्धास जाणाऱ्या राजाप्रमाणे ( तटांना ) सिंचन करीत जेव्हा तू जातेस तेव्हा याच्यापुढे असतेस. १०-७५-४[५] हे गंगे, यमुने, सरस्वती शुतुद्रि तुम्ही परुष्णि आणि असिक्नि या नद्यासह हे माझे स्तोत्र स्वीकारा. हे मरुद्वृधे तू वितस्तेसह आणि आर्जीकीये तू सुषोमेसह ऐक १०-७५-५[६] हे सिंधू, प्रथम तुष्टामयाशी संगत होऊन सुसर्तु, रसा आणि श्वेती याना घेऊन मग कुभा, गोमती, क्रुमु, मेहत्नु यांना घेऊन एका रथात बसल्याप्रमाणे चालतेस (१०-७५-६).[७] सरळ वाहणारी, श्वेतवर्णा, दीप्यमाना, वेगवती जल देणारी, हिंसा न करणारी नद्यामध्ये श्रेष्ठ सिंधु सुंदर शरीराच्या घोडीप्रमाणे सुंदर दिसते (१०-७५-७)[८] उत्तम घोड्याच्या सुंदर रथात बसलेली. उत्तम वस्त्रे परिधान केलेली, सोन्याची भूषणे घातलेली, अन्न देणारी, ऊर्णावती, सीलमावती, युवती, सुभगा सिंधु मधुवर्धकाने आच्छादिली आहे (१०-७५-८).[९] सिंधूनें सुखकारक रथाला अश्व जोडला.

---

२. प्र सु व आपो महिमानमुत्तमं कारुर्वोचाति सदने विवस्वतः ।
प्र सप्तसप्त त्रेधा हिही चक्रमुः प्र सृत्वरीणामति सिन्धुरोजसा ।।

३. प्र तेऽरदद्वरुणो यातवे पथः सिन्धो यद्वाजाँ अभ्यद्र स्त्वम् ।
भूम्या अधि प्रवता यासि सानुना यदेषामग्रं जगतामिरज्यसि ।।

४. दिवि स्वनो यतते भूम्योपर्यनन्तं शुष्ममुदियर्ति भानुना ।
अभ्रादिव प्र स्तनयन्ति वृष्टयः सिन्धुर्यदेति वृषभो न रोरुवत् ।।

५. अभि त्वा सिन्धो शिशुमिन्न मातरो वाश्रा अर्षन्ति पयसेव धेनवः ।
राजेव युध्वा नयसि त्वमित्सिचौ यदासामग्रं प्रवतामिनक्षसि ।।

६. इमं मे गङ्गे यमुने सरस्वति शुतुद्रि स्तोमं सचता परुष्ण्या ।
असिक्न्या मरुद्वृधे वितस्तयार्जीकीये श्रृणुह्या सुषोमया ।।

७. तृष्टामया प्रथमं यातवे सजूः सुसर्त्वा रसया श्वेत्या त्या ।
त्वं सिन्धो कुभया गोमतीं क्रुमुं मेहत्न्वा सरथं याभिरीयसे ।।

८. ऋजीत्येनी रुशती महित्वा परि ज्रयांसि भरते रजांसि ।
अदब्धा सिन्धुरपसामपस्तमाश्वा न चित्रा वपुषीव दर्शता ।।

९. स्वश्वा सिन्धुः सुरथा सुवासा हिरण्ययी सुकृता वाजिनीवती ।
ऊर्णावती युवतिः सीलमावत्युताधि वस्ते सुभगा मधुवृधम् ।।



अनुक्रमणिका








त्याने ह्या युद्धात आम्हाला अन्न देवो. कोणाकडूनही हिंसा न केली जाणाऱ्या, स्वयशाने महत्त्व पावलेल्या ह्याचा श्रेष्ठ महिमा वृद्धिंगत होतो ( १०-७५-९ )[१०] हे नदीसूक्त नावाने ओळखले जाणारे सूक्त प्रायः सिंधु नदीच्या स्तुतिपर असले तर त्यात ऋचा पांच आणि सहामध्ये इतर नद्यांची नावेही आली आहेत. त्यापैकी काही नद्यांचे प्रचलित नद्यांशी ऐक्य दाखविले आहे त्याचा विचार करू.

## सिंधू व तिच्या मुख्य उपनद्या

सिंधू हा शब्द ऋग्वेदात तीन अर्थांनी आला आहे. एक, सिंधू म्हणजे सामान्यतः नदी. दुसरा सिंधू म्हणजे समुद्र आणि तिसरा व महत्त्वाचा सिंधू म्हणजे सिंधू नदी होय. ऋचातून कधी कधी सिंधूचा देवता म्हणूनही उल्लेख आहे. परंतु तेथे सिंधू नदीच अभिप्रेत दिसते. यावरून हे दिसते की ऋग्वेदातील ऋचाकाराना सिंधूबद्दल इतका आदर वाटत होता की ते तिला देवता मानीत. सिंधूचे निरुक्त ' सिन्धुम् स्यन्दनमानम् ' १-१४६-४ 'सिन्धुम् स्यन्दनशीलां नदीम् ' १-११२-९ असे आहे. हीच कल्पना घेऊन नदीसूक्तात सिंधूला रथात बसून गमन करणारी म्हटले आहे. सिंधू ही ऋचातील श्रेष्ठ नदी असून तिचा उल्लेख ऋचातून प्राचुर्याने आहे. वेदोत्तर काळातही ती त्याच नावाने आणि तितकीच प्रसिद्ध आहे. महाभारतात तिचा उल्लेख तिच्या पाच उपनद्यासह आला आहे. तो असा :

शतद्रुश्च विपाशा च तृतीयेरावती तथा ।
चद्रभागा वितस्ता च सिन्धु षष्ठा बहिर्गिरेः ॥

महा. क. प. अ. ४४ श्लो. ३२

ग्रीक लेखकानीही हीच नावे दिली आहेत व यास्कानेही हीच नावे दिली आहेत. प्रचलित नावाशी त्याचे साम्य आहे. म्हणजे यास्काच्या वेळेपासून आजच्या पंजाबात समाविष्ट असलेल्या सिंधूच्या पाच उपनद्या त्याच नावाने ओळखल्या जातात. महाभारतातील वरील श्लोकात तर त्या क्रमवारीने आल्या आहेत. त्यांचा ऋग्वेदाच्या अनुषङ्गाने विचार करू.

## शुतुद्री

शुतुद्री या नावात हल्लीचे सतलज हे नाव कायम आहे. शुतुद्री यात शुत आणि उद्री असे दोन शब्द आहेत. शुत म्हणजे श्वेत आणि उद्री म्हणजे जल. शुतचे सत आणि जल याचे वर्णव्यत्यासाने लज मिळून शुतुद्री या मूळ अर्थी सतलज हे नाव आलेले दिसते हे नाव अलीकडे आणि उच्चाराचे सोयीसाठी झाले असावे. महाभारतात वेदांतील शुतुद्रीचे ऐवजी शतद्रु हे नाव आहे. त्यात थोडासा फरक असला तरी नाव आणि नावाचा अर्थ वेदातील नावाशी समान आहे. ग्रीकांचे हेसुद्रुस किंवा हेसिद्रुस या नावाचे शुतुद्रीशी साम्य आहे. प्रचलित सतलज हे नाव वेगळे असले तरी त्यात वेदातील शुतुद्रीचा अर्थ कायम आहे. त्यामुळे ऋचातील शुतुद्रीचे प्रचलित सतलजशी ऐकात्म्य सिद्ध होते.

ऋचातील शुतुद्रीचे सतलजशी ऐक्य दाखविणारी आणखी एक महत्त्वाची गोष्ट आहे. ऋचा ३-३३-१[११] मध्ये शुतुद्री आणि विपाट् या जोडनद्यांचे फार काव्यमय वर्णन आहे. विपाट म्हणजे बिआस नदीने आपला प्राचीन प्रवाह बदलला असला तरी शुतुद्री आणि विपाट म्हणजे अनुक्रमे सतलज आणि बिआस संगत होऊन सिंधूला मिळतात. शुतुद्रीचे आणि विपाटचे जे वर्णन ऋचा ३-३३-१ मध्ये आहे त्याचा अर्थ असा : " शैलाच्या उत्संगावरून कामुक झालेल्या मोकळ्या सुटलेल्या घोडीप्रमाणे खिंकाळत किंवा वासरांना चाटण्यास उत्सुक झालेल्या पययुक्त पांढऱ्या गायीप्रमाणे विपाट् आणि शुतुद्री जोराने धावतात. " या दोन्ही नद्यांची नावे यास्काने तीच दिली आहेत.

## विपाट्

विपाट नदीचे प्रचलित नाव बिआस. बिआस हे विपाटचेच रूप आहे. विपाट म्हणजे विपाश. विपाशचा अर्थ विशेष पाश असलेली म्हणजे पुष्कळ कालवे असलेली. प्रचलित मराठीतही कालव्याला

१०. सुखं रथं युयुजे सिन्धुरश्विनं तेन वाजं सनिषदस्मिन्नाजौ ।
महान् ह्यस्य महिमा पनस्यतेऽदब्धस्य स्वयशसो विरप्शिनः ॥

११. प्र पर्वतानामुशती उपस्थादश्वेइव विषिते हासमाने ।
गावेव शुभ्रे मातरा रिहाणे विपाट्छुतुद्री पयसा जवेते ॥

पाटच म्हणतात. विपाशाचे बिआस हे प्राकृत रूप उच्चार करण्यास सोपे आहे हे कळण्यास कठीण नाही. शुतुद्री आणि बियास या सिंधूस मिळणाऱ्या नद्यांचे काव्यमय वर्णन वर आलेच आहे. विपाट् सिंधूस मिळाल्याचा स्पष्ट उल्लेख ऋ. ३-३३ मध्ये आहे.

येथे एका महत्त्वाच्या गोष्टीचा निर्देश केला पाहिजे की जरी हरप्पा शहर रावी नदीवर उत्खनित झाले आहे तरी रावीच्या उत्तरेस सिंधुशहरे उत्खनित झाली नाहीत. सतलज आणि बिआसच्या खोऱ्यात मात्र विशेषतः बिआसच्या तीरावर सिंधशहरे उत्खनित झाली आहेत. यावरून उत्खनन करणारांचा असा तर्क आहे की बिआस नदी सतलजला मिळाल्यावर सतलज सरस्वती नदीस मिळत असावी व सरस्वतीतूनच सिंधु संस्कृतीचे लोक वर सतलज व बिआसच्या खोऱ्यात गेले असावे. परंतु हा तर्क बरोबर दिसत नाही. बिआस सिंधूला मिळाल्याचा उल्लेख ऋचात आहे. सिंधुशहरे सरस्वतीच्या तसेच शुतुद्री आणि विपाटच्या काठी आहे म्हणून विपाट सरस्वतीला मिळत असावी हा तर्क बरोबर दिसत नाही.

## परुष्णी

परुष्णी म्हणजे रावी, वरील महाभारतातील श्लोकात तिसरी इरावती नदी असा उल्लेख आहे. वरील महाभारतातील श्लोकात परुष्णी हे ऋचातील नाव नाही. त्याच्याऐवजी प्रचलित इरावती हे नाव आहे. ग्रीक लेखकानी तिचे नाव रावोती अथवा रावती म्हणजे इरावती हेच दिले आहे. इरावती याचा अर्थ जलवती असा आहे, इर हा ऋचातील जलवाचक शब्द आहे. ऋचातून दाशराज्ञ युद्ध परुष्णी नदीच्या काठी झाल्याचा उल्लेख आहे. परुष्णी म्हणजे हल्लीची रावी होय. रावी हे नाव इरावती या नावावरून आलेले दिसते. शेवटच्या 'वती' प्रत्ययाचा लोप होऊन इराचे वर्णव्यत्यासाने रावी हे रूप झाले असावे. रावी नदीच्या काठी सिंधुउत्खननातील अत्यंत महत्त्वाचे 'हराप्पा' शहर उत्खनित झाले आहे. 'हरियूपीया' शहराचा उल्लेख ऋग्वेदातील सहाव्या मंडळातील सत्ताविसाव्या सूक्तात आहे. ते वरशिखांच्या वंशाचे ताब्यात होते. अभ्यावर्ती चायमानाने त्याला वेढा घालून ते अग्नीच्या साह्याने जिंकून घेतले. ऋचातील हरियुपीया व उत्खननातील हरप्पा एकच आहेत हे इतरत्र दाखविले आहे.

वर नदी सूक्तात टीप ९ मध्ये सिंधूला 'उर्णावती' हे विशेषण आहे. तो शब्द भाषांतरात तसाच ठेवला आहे, त्याचा येथे विचार प्रस्तुत आहे. परुष्णी संबंधी आलेल्या ऋचा ४ २२ २ व ५-५२-९ मध्ये 'उर्णाः' हा शब्द आला आहे. त्यातील ऋचा ४-२२-२ चा अर्थ असा : "हे कामांचा वर्षाव करणाऱ्या उग्र, नरश्रेष्ठ कर्मवान् ( इन्द्रा ) चार धारांचे वज्र हाताने फेकून तटबंदीच्या शहरांच्या परुष्णी नदींचे सर्व भाग आश्रयासाठी आणि मैत्रीसाठी मिळविले. ऊर्ण शब्द आलेली ही दुसरी ऋचा तिचा अर्थ असा : "मरुतांनी जी परुष्णीमध्ये आवरण असलेली ( शहरे ) होती ती तटबंदीची शहर तेजाने, रथाच्या चाकाच्या नेमीने ( वेढा घालून ) फोडली."

ह्या दोन्ही ऋचा परुष्णीच्या स्तुतिपर आहेत. त्यात 'ऊर्ण' हा शब्द आला आहे. वर नदी-सूक्तातही सिंधूच्या संबंधात हा शब्द आला आहे. त्याचा सायणाने काय अर्थ दिला आहे त्याचा प्रथम विचार करू. त्यापूर्वी येथे हे सांगितले पाहिजे की आर्य येण्यापूर्वी भारतात सिंधुसंस्कृती नावाची एखादी संस्कृती असेल आणि आर्यांनी तिचा नाश केला असेल याची कल्पना सायणास नव्हती. टीप ९ मध्ये आलेल्या ऋचा १०-७५-८ मध्ये सिंधुनदीला उद्देशून 'ऊर्णावती' हा शब्द आला आहे. त्यावरील सायणाचे भाष्य असेः "ऊर्णावती तस्याः समीपे देशे हि सन्त्यूर्णाः यासां रोमभिः कम्बला क्रियन्ते।" त्याचा अर्थ असाः "अर्णावती तिच्या ( सिंधूच्या ) समीप देशात ज्यांच्या केसांची कांबळी केली जात होती अशा मेंढ्या होत्या. ऊर्ण याचा अर्थ सायणाने मेंढी असा दिला आहे. ऋचा ४-२२-२ मध्ये ऊर्णाम् याचा अर्थ "आच्छादिकाम् म्हणजे आवरण असलेली असा दिला आहे. जसे वरील ऋचेत 'ऊर्णावती' हे सिंधूचे विशेषण आहे तसे येथे ते परुष्णीचे आहे. ऋचा ५-५२-९ मध्ये परुष्णीत ऊर्ण होते असा उल्लेख आहे त्याचा अर्थ सायणाने "ऊर्णाः दीप्तीः" असा दिला आहे. 'ऊर्ण' शब्दाचे सायणाने दोन ठिकाणी दोन वेगळे अर्थ दिले आहेत. त्यावरून सायण ऊर्ण शब्दाच्या अर्थाबद्दल निश्चित नाही. ऊर्ण म्हणजे तंतू आणि पर्यायाने लोकरीचे आवरण असलेल्या मेंढ्या असा अर्थ केला असण्याची शक्यता








आहे. परंतु सिंधूला 'ऊर्णावती' म्हणजे मेंढ्या असलेली म्हणण्यात काहीही औचित्य अथवा स्वारस्य नाही. तसेच परुष्णी नदीत उर्ण म्हणजे 'दीप्ती' होत्या असे म्हणण्यानेही कोणताही अर्थबोध होत नाही. ऊर्ण हा शब्द आवरण असलेले या अर्थी आहे. तो तटबंदी असलेल्या शहरांना लावला असण्याची फार शक्यता आहे. त्याने ऋचातील सर्व अर्थ बरोबर जुळतात. सिंधू आणि रावी या दोन्ही नद्यांचे काठी तटबंदीची शहरे उत्खनित झाली आहेत. सिंधुसंस्कृतीतील प्रसिद्ध शहर हरियुपिया (हरप्पा) रावी नदीचे काठी उत्खनित झाले आहे. तटबंदी या अर्थी अद्री, अश्मन्, गोत्र इत्यादी शब्द ऋचातून आले आहे. ऊर्ण याचाही अर्थ निश्चितपणे तोच दिसतो. यावरून परुष्णी ही सिधु-संस्कृतीच्या आणि ऋग्वेदाच्या काळी प्रसिद्ध नदी होती ती हल्लीची रावीच होय हे निश्चितपणे दिसून येईल.

### असिक्नी

ही हल्लीची चिनाब नदी होय. वरील महाभारतातील श्लोकात तिला चंद्रभागा म्हटले आहे ग्रीक लेखकांनी तिचा अकिसिनी व सांडोबागा असा उल्लेख केला आहे. सांडोबागा हे चंद्रभागा याचेच रूप आहे हे उघड आहे. अकिसिनी हे असिक्नीचे रूप आहे हेही उघड आहे. असिक्नी हे वैदिक नाव आहे. असिक्नी परुष्णी या नावाचे शेवटी असलेला नी हा प्रत्यय नदीवाचक असावा. हल्लीचे चिनाब हे नाव वैदिक असिक्नी या नावावरून आले असे दिसत नाही. ते बहुतेक चंद्रभागा या नावावरून आले असण्याची शक्यता आहे. अक्सिनी हा शब्द ऋचातून सहा वेळा आला आहे. परंतु वरील नदीसूक्तातील आलेले नाव सोडून असिक्नीचे नाव दुसऱ्या ऋचातून आले नाही. अक्सिनीचा अर्थ कृष्णवर्ण आणि रात्री असा आहे. अक्सिनी आणि चंद्रभागा ही नावे एकाच नदीची असून ती हल्लीची चिनाब होय हे दिसेल.

### वितस्ता

ही हल्लीची झेलम होय. वरील महाभारताच्या श्लोकातही तिचे वेदात असलेले वितस्ता हे नाव होय. वितस्ता हे नाव ऋचातून फक्त एकच वेळा आणि तेही फक्त नदीसूक्तात सिंधूला मिळणारी नदी म्हणून आले. वितस्ताचे ग्रीक नाव बिडास्पी बिहात असे आहे. प्रचलित झेलम हे नाव कसे आले ते सांगणे कठीण आहे. असिक्नी आणि वितस्ता ही दोन्ही नद्यांची नावे ऋचातून फक्त एकच वेळ आले आहे. त्याचे कारण असे दिसते की त्यांच्याशी आर्यांचा फार संपर्क आला नसावा. या नद्यांच्या काठी सिंधु-शहरेही उपलब्ध झाली नाहीत.

सिंधू आणि तिच्या उपनद्या ऋग्वेद काळी आजच्या सारख्याच होत्या. व त्यांच्यापैकी काहीच्या काठी सिंधुशहरेही होती.

### सिंधूस पश्चिमेकडून मिळणाऱ्या नद्या

सिंधूला पश्चिमेकडून मिळणाऱ्या नद्या विशेष महत्त्वाच्या नसल्या तरी ऋचातून त्यांचे वर्णन आहे. या नद्यातील महत्त्वाची नदी कुभा ही होय. तीच हल्लीची काबूल नदी समजली जाते तिचे वर्णन ग्रीकांनी कोफी असे केले आहे. व ती प्युकेला ओती (पुष्कलावती) प्रातातून येऊन मिळते असे लिहिले आहे. नदीसूक्तातील गोमती आणि क्रुमू ह्या काबूल नंतर सिंधूला पश्चिमेकडून येऊन मिळणाऱ्या गोमल आणि कुरम ह्या होत. तुष्टामा, सुसर्तु, रसा आणि श्वेती ह्या काबूल नदीच्यावर पश्चिम उत्तर भागातून वहात येऊन सिंधूला मिळणाऱ्या नद्या असाव्या. सुवास्तु नदीचे काबूल नदीस मिळणाऱ्या स्वात नदीशी ऐक्य समजतात. असे ऋचातील सिंधू व तिच्या उपनद्यांचे प्रचलित सिंधु व तिच्या उपनद्यांशी ऐक्य आहे.

डॉ. सिंघल यांच्या वर निर्देशिलेल्या पुस्तकाचा कणा पाच लक्षवर्षांपूर्वी गंगेचे मैदान, राजपुताना व सिंध या भागात समुद्र होता. त्या वेळी आर्य भारतात होते व प्रचलित ऋग्वेदाची रचनाही त्याच वेळी झाली. ही कल्पना होय. प्रचलित ऋग्वेदात गंगा-यमुनाचे मैदानात, राजपुतान्यात व सिंध प्रांतात समुद्र नसून त्यात आज अस्तित्वात असलेल्या नद्याच आस्तित्वात होत्या.

### सरस्वती

ऋग्वेदातील सर्वात श्रेष्ठ आणि पवित्रतम नदी सरस्वती होय. ऋग्वेदकाली आजच्या प्रमाणे राजपुताना वाळवंट नव्हता व सरस्वती सुकलेली नव्हती. ती श्रेष्ठतम नदी होती. तिच्या काठावर पणींची तटबंदीची








शहरे होती. त्यांची रांगच्या रांग उत्खननात उपलब्ध झाली आहे. सरस्वती पणींच्या ताब्यात होती. तिच्यातून ते दूरवर व्यापार करीत व खूप द्रव्य मिळवीत. सरस्वतीतून कालवे काढून त्याचा धान्य पिकविण्यासाठी उपयोग करीत. सरस्वतीच्या स्तुतिपर ऋग्वेदात जितक्या ऋचा आहेत तितक्या इतर कोणत्याही नदीच्या स्तुतिपर नाहीत. सरस्वती नुसती नदीच नव्हती तर तिला देवत्व प्राप्त झाले होते. सरस्वतीच्या तीरावर आर्यांनी सर्व प्रथम वस्ती केली व पणीशी दीर्घ कालपर्यंत संघर्ष करून त्यानी आपले सर्व प्रथम सरस्वती आणि दशद्वतीच्या मध्यभागी ब्रह्मावर्ताचे राज्य स्थापले. आणि म्हणूनच आर्यांना ती इतर सर्व नद्यांपेक्षा श्रेष्ठ आणि महत्त्वाची होती. सरस्वती इतका आर्यांचा इतर नद्यांशी संबंध आला नाही. वेदोत्तरही सरस्वती नदी आणि ब्रह्मावर्त देश सर्वात पवित्र मानले जात होते. ऋग्वेदात सरस्वतीच्या स्तुतिपर आलेल्या थोड्या ऋचांचा विचार करू. ऋचा १–१६४–४९[१२] चा अर्थ असा "हे सरस्वती तुझ्या देहावरील जो सुखमय स्तन आहे, ज्याने वरणीय धनांचा परिपोष करतेस, जो रमणीय वस्तूंचा धारण करणारा धनांचा वेत्ता व पुष्कळ वस्तु मिळवून देणारा आहे तो येथे आमचे पोषण करील असे कर."

ऋचाकारांचे सरस्वतीचे ठायी मातृवत् प्रेम होते. तिच्यामुळे त्याना बहुविध लाभ होतात अशी त्यांची कल्पना होती. ऋचात सरस्वतीचा नदी म्हणून व देवी म्हणून उल्लेख आहे. सरस्वती प्रार्थनांची देवता आहे अशी तिच्याबद्दल ऋचातून देखील कल्पना आहे. सरस्वतीबरोबर भारती आणि इळा या दोन देवतांचाही उल्लेख आढळतो. सरस्वतीचे देवतारूपही नदीरूपच आहे असे दिसते. सरस्वतीच्या देवता आणि नदीरूपासंबंधी माहिती ऋचा १–३–१०[१३]; ११[१४] व १२[१५] या ऋचातून आली आहे. त्याचा अनुक्रमे अर्थ असा "आम्हाला पावन करणारी अन्नवती कर्मप्राप्यधनास निमित्त होणारी सरस्वती अन्नाने यज्ञ करण्याची इच्छा करो."

"सत्यांची प्रेरक, चांगली बुद्धी जागृत करणारी, सरस्वती यज्ञ धारण करते."

"फार मोठ्या उदकाची सरस्वती कर्माने (स्वतःचे) ज्ञान करून देते. प्रज्ञेने सर्वांना प्रकाशित करते."

सरस्वती नदी हे कर्माने भक्तांच्या इच्छा सफल करणारे शरीर व त्यांच्या बुद्धीला प्रकाश देणारी सरस्वती देवता. अशी सरस्वतीची दोन रूपे आहेत. ऋचा २–३०–८[१६] मध्ये सरस्वतीची स्तुती आहे. तिचा अर्थ असा: "हे सरस्वती तू आमचे रक्षण कर. मरुतांनी युक्त, घर्षण करणारी तू शत्रूला जिंक. त्या प्रसिद्ध स्पर्धा करणाऱ्या शण्डिकांच्या श्रेष्ठाला इंद्राने जाळून ठार मारले." ६–६१ हे संपूर्ण सूक्त सरस्वतीच्या स्तुतिपर आहे. त्यातील पहिली ऋचा वर उद्धृत केली आहे. ऋचा ६–६१–२[१७] चा अर्थ असा : "ही शोषण करणाऱ्या भयंकर मोठ्या उर्मींनी पर्वतांची शिखरे कमल तोडण्यासाठी खणलेल्या चिखलाप्रमाणे फोडली. दूरच्या प्रदेशात राहणाऱ्यांना ठार मारणाऱ्या सरस्वतीची ह्या चांगल्या केलेल्या स्तुतीने आम्ही सेवा करतो." वरील ऋचेत जो शोषण करणाऱ्या प्रकाशमान उर्मींचा आणि पर्वतांच्या शिखरांचा उल्लेख आहे तो अग्नीच्या साह्याने जाळलेल्या सिंधु शहरांचा उल्लेख असणे संभवते. सिंधु–शहरांना अनेक ऋचातून पर्वत आणि अद्री म्हटले

१२. यस्ते स्तनः शशयो यो मयोभूर्येन विश्वा पुष्यसि वार्याणि ।
यो रत्नधा वसुविद्यः सुदत्रः सरस्वति तमिह धातवे कः ॥ १·१६४·४९

१३. पावका नः सरस्वती वाजेभिर्वाजिनीवती । यज्ञं वष्टु धियावसुः ॥ १·३·१०

१४. चोदयित्री सूनृतानां चेतन्ती सुमतीनाम् । यज्ञं दधे सरस्वती ॥ १·३·११

१५. महो अर्णः सरस्वती प्र चेतयति केतुना । धियो विश्वा वि राजति ॥ १·३·१२

१६. सरस्वति त्वमस्माँ अविड्ढि मरुत्वती धृषती जेषि शत्रून् ।
त्यं चिच्छर्धन्तं तविषीयमाणमिन्द्रो हन्ति वृषभं शण्डिकानाम् ॥ २·३०·८

१७. इयं शुष्मेभिर्बिसखाइवारुजत्सानु गिरीणां तविषेभिरूर्मिभिः ।
पारावतघ्नीमवसे सुवृक्तिभिः सरस्वतीमा विवासेमधीतिभिः ॥ ६·६१·२



अनुक्रमणिका







असून अग्नीच्या ज्वालांना प्रकाशमान लाटा म्हटले आहे. याऋचेच्या वरील पहिली ऋचा सरस्वतीने पितृऋण फेडणारा वध्यश्वाला दिवोदास नावाचा पुत्र दिला. त्याने पर्णींना सरस्वतीच्या तीरावरुन खणून काढल्याबद्दल आहे. या ऋचेत त्याची शहरे जाळ-ण्याचा उल्लेख असल्याचे दिसते. ऋचा ६–६१–६[१८] चा अर्थ असा " हे अन्नवती सरस्वती तू संग्रामात आमचे रक्षण कर. तू आम्हाला पोषणकरणाराप्रमाणे उपभोग्य धन दे " ऋचा ६–६१–७[१९] चा अर्थ असा : " ही शत्रूला भयकारिणी, सोन्याचा रथ असलेली, शत्रूला ठार मारणारी सरस्वती आमच्या सुस्तुतींची इच्छा करो " " ऋचा ७–९५–१ [२०] चा अर्थ असा " ही लोखंडी ( पक्क्या ) शहराप्रमाणे धारण करणारी सरस्वती धारण करणाऱ्या उदकासहित मोठी बाधा उत्पन्न करते. इतर नद्याबरोबर रथात बसून जाते. " सिंधू तटबंदीच्या पक्क्या शहराप्रमाणे रक्षण करतो व एखादा राजा जसा शत्रूंना ठार मारत जातो तशी रथात बसून जाते अशी कल्पना आहे. सरस्वतीच्या काठचा प्रदेश आर्यांच्या ताब्यात आल्यावर तेथे चित्र नावाच्या राजाने सरस्वतीच्या काठी मोठे यज्ञ करून ब्राह्मणांना फार मोठी दाने दिली. त्याचे वर्णन ऋचा ८–२१–१७ व १८ मध्ये आहे. त्यातील ऋचा ८–२१–१८[२१] चा अर्थ असाः " दुसऱ्या लहान राजाकडून धन घेऊन चित्र राजाने सरस्वतीच्या तीरावर यज्ञ केला. ( त्यात ) पर्जन्य जसा वृष्टी करतो तशी सहस्र आणि अयुत धनांची दाने दिली. " वरील ऋचेवरून सरस्वतीच्या तीरावर बरीच लहान लहान राज्ये होती असे दिसेल.

**दृशद्वती**

दृशद्वति व आपया या दोन नद्यांची नावे सरस्वती-बरोबर येतात. दृषद्वती व आपया ह्या दोन्ही लहान नद्या असाव्या. आपया नदी हल्ली कोणत्या नावाने ओळखली जाते हे माहीत नाही. दृषद्वती ही हल्लीची चौटांग नदी होय. सरस्वती व दृषद्वती यांच्या मध्य-भागी आर्यांचे सर्व प्रथम राज्य ब्रह्मावर्त स्थापन झाले असल्याचे आपण पाहिले. दृषद्वती, आपया आणि सरस्वति यांचा एकत्र उल्लेख ऋचा ३-२३-४[२२] मध्ये आहे. तिचा अर्थ असा : " हे अग्ने तुला इळा पृथ्वीच्या वरच्या भागात सुमुहूर्तावर स्थापिले. दृषद्वतीत, आपयामध्ये व सरस्वतीत मनुष्यामध्ये द्रव्ययुक्त होत्साता दीप्यमान हो. " दृषद्वतीचा उल्लेख फक्त एकाच ऋचेत आहे. ती लहान नदी असून सरस्वती-प्रमाणे महत्त्वाची नसावी. तिचा उल्लेख नदी-सूक्तात नाही.

**गंगा**

आज भारतातील पवित्रतम नदी गङ्गा होय. गङ्गेइतके महत्त्व दुसऱ्या कोणत्याही नदीला नाही. ऋचांच्या काळी सरस्वती ही पवित्रतम नदी होती. ऋचाच्या काळी गंगेला आजच्यासारखे महत्व नव्हते. गंगेचे नाव फक्त नदीसूक्तातच आले आहे. गंगा त्या काळी पवित्रतम व महत्त्वाची नसली तरी ऋचाच्या काळी ती प्रसिद्ध नदी होती व तिच्या काठी हजारांनी द्रव्य मिळविणारा व हजारांनी दान करणारा ऋचातून स्तुती असलेला बृबू नावाचा श्रीमान पणी राहात होता. तो आर्य कवींना हजारानी दाने करी. बृबू गंगेच्या उन्नत तटाकाप्रमाणे शोभत होता असे त्याचे ऋचा ६–४५–३१ मध्ये वर्णन आहे.

**यमुना**

गंगेला मिळणारी यमुना ऋचांच्या काळीही प्रसिद्ध नदी होती. दाशराज्ञ युद्धात सुदासाला मदत करणाऱ्या तृत्सूंनी यमुनेच्या तीरावर राहणाऱ्या भेदावर स्वारी

---

१८. त्वं देवि सरस्वत्यवा वाजेषु वाजिनि । रदा पुषेव नः सनिम् ॥ ६·६१·६

१९. उत स्या नः सरस्वती घोरा हिरण्यवर्तनिः । वृत्रघ्नी वष्टि सुष्टुतिम् ॥

२०. प्र क्षोदसा धायसा सस्र एषा सरस्वती धरुणमायसी पूः ।
प्रबाबधाना रथ्येव याती विश्वा अपो महिना सिन्धुरन्याः ॥ ७·९५·१

२१. चित्र इद्राजा राजका इदन्यके यके सरस्वतीमनु । पर्जन्यइव ततनद्धि वृष्ट्या सहस्रमयुता ददत् ॥
८·२१·१८

२२. नि त्वा दधे वर आ पृथिव्या इळायास्पदे सुदिनत्वे अह्नाम् । दृषद्वत्यां मानुष आपयायां सरस्वत्यां रेवदग्ने दिदीहि ॥ ३·२३·४








करून त्याचे सर्वस्व लुटले. त्यावेळी तेथील अज शिग्रू आणि यक्षू यांनी तृत्सूंना घोड्याचे करभार दिले असा उल्लेख ऋचा ७-१८-१९ मध्ये आहे. त्यावरून हे स्पष्ट आहे की यमुनेच्या तीरावर त्या काळी पर्णींची समृद्ध राज्ये होती. यमुनेचा उल्लेख असलेल्या ऋचा ५-५२-१७[२३] चा अर्थ असा : " शक्तिमान सप्त मरुत्संघापैकी प्रत्येकाने शंभर शंभर दिलेल्या त्या प्रसिद्ध गोधन आणि अश्वधनाला यमुनेमध्ये धुतो. " यमुनेच्या काठी पर्णींची वस्ती असून तो भाग ऋचांच्या काळी आजच्या प्रमाणेच समृद्ध होता. आजच्या प्रमाणेच गंगायमुना ह्या ऋचांच्या काळीही जोडीने जाणाऱ्या नद्या होत्या.

नदीसूक्तातील आणि ऋग्वेदात इतरत्र उल्लेख आलेल्या महत्त्वाच्या नद्यांचा आपण विचार केला. त्यावरून सिंध राजपुताना व गंगायमुनाचे मैदान या भागात ऋचांच्या काळी समुद्र नसून तो सर्व भूप्रदेश आज आहे तसाच होता. तेथील नद्याही आजच्या प्रमाणेच होत्या. मध्यंतरीच्या काळात काही बदल झाला असला तर तो एवढाच की राजस्थानचा समृद्ध आणि सुपीक असलेला भाग वाळवंट झाला व तेथील नद्या सुकल्या. प्रसिद्ध सरस्वती नदीही कोरडी झाली. त्या भागात ऋग्वेदकाळी समुद्र होता असे म्हणणे चुकीचे, ऋग्वेदाच्या विरुद्ध व विपर्यस्त, व निष्कारण गोंधळ निर्माण करणारे आहे.

---

२३. सप्त मे सप्त शाकिन एकमेका शता ददुः ।
यमुनायामधि श्रुतमुद्राधो गव्यं मृजे नि राधो अश्व्यं मृजे ॥ ५.५२.१७





अनुक्रमणिका







प्रा. प्यारेलाल गोहेल

# सत्ताधारी व विचारवंतात सुसंवाद

'कायद्याचे राज्य' या मूलभूत तत्त्वावर निष्ठा आणि त्या निष्ठेच्या पायावर लोकशाही-राज्य कारभाराची इमारत सुदृढ पायावर उभारण्यासाठीच आम्ही संपूर्ण स्वातंत्र्याचा पुरस्कार केला. ४२ च्या 'भारत छोडो' या मुंबईच्या ऐतिहासिक ठरावात आम्ही आमच्या स्वातंत्र्यप्राप्तीची उद्दिष्टे व व्याप्ती निश्चित केली होती. आमचे स्वातंत्र्य हे आम्हाला नव्हे तर जगातील सर्व गुलाम राष्ट्रांना प्रेरणादायक व आदर्श ठरणारे असे होते. परंतु असे असून देखील आज भारताने स्वातंत्र्याच्या खऱ्या मूल्यांचा नव्याने विचार करण्याची वेळ येऊन ठेपली आहे.

## आत्मपरीक्षण

स्वातंत्र्योत्तर काळात आमची भोगवादी मनोवृत्ती मूळ धरू लागली. स्वार्थत्याग, राष्ट्रनिष्ठा व जीवन मूल्यांवरची श्रद्धा प्रत्यक्ष सत्ताधारी लोकांच्या जीवनात अभावानेच चमकताना दिसते. वर्तमानकाळात भारतावर चोहोबाजूंनी येत असलेल्या संकटांच्या संदर्भात आम्ही स्वतःचे आत्मनिरीक्षण करणे आवश्यक झाले आहे. संकटांच्या भयाने अनेक राष्ट्र प्रयत्नवादी बनल्याची उदाहरणे आहेत परंतु भीतीच्या अभावात प्रयत्नवादी राहण्याचे दिव्य करून दाखविणारी राष्ट्रेच खऱ्या अर्थाने उन्नतीचे मानकरी होऊ शकतात. भारतासारख्या खण्डप्राय राष्ट्राला 'राष्ट्र' या नात्याने स्वतःची उन्नती, समृद्धी व विकास करून घेता येणे शक्य आहे काय? असा प्रश्न आजच्या राष्ट्रीय समस्यांकडे पाहिल्यानंतर मनात येतो.

## महान ध्येयाचे महान चित्र

आपण स्वातंत्र्यासाठी झगडत होतो, त्या वेळी एका दृष्टीने आपले काम फार सोपे झालेले होते. आपल्या वाडवडिलांनी देशामध्ये राष्ट्राबद्दल एक महान ध्येयाचे चित्र आपल्या डोळ्यापुढे उभे करून ठेवले होते. राष्ट्रीय स्वातंत्र्याचे उद्दिष्ट गाठता आले म्हणजे आपण आपले सारे प्रश्न भराभर सोडवू शकू या भावनेने सारा देश उभा राहिला होता. पुढाऱ्यांना त्यासाठी फार कष्ट करावे लागले हे तर खरेच परंतु ज्याला राष्ट्रीय भावना म्हणता येईल अशी भावना त्यावेळी सर्वत्र निर्माण झालेली होती. हा तपोनिधी उभारण्यासाठी नानाप्रकारची व्रते-वैकल्ये आणि तपस्या त्या वेळच्या पुढाऱ्यांनी आणि कार्यकर्त्यांनी केल्या. स्वदेशीचे व्रत घेऊन ते पतिव्रतेच्या निष्ठेने पाळले. चार पैसे अधिक पडले तरी बेहेत्तर पण स्वदेशी घेईन असे म्हणणारी व त्याप्रमाणे वागणारी हजारो, लाखो माणसे लोकमान्यांनी व म. गांधींनी उभी केली; परंतु आज स्वातंत्र्य मिळून १८ वर्षे झाल्यानंतर जे चित्र दिसते ते कोणत्या मनोवृत्तीचे द्योतक आहे?

## सामर्थ्यावर संयमाच्या नियंत्रणाची गरज

स्वराज्य हे साधन असून समाजाचे सुख व समृद्धी प्राप्त करून देणे हे आमचे साध्य होय. या बहुदुर्लभ साधनाचा तसा उपयोग का होत नाही? त्याला कोण जबाबदार आहेत, याचा तात्त्विकदृष्ट्या शोध घेणे आवश्यक आहे.

भारतात लोकशाही जीवनपद्धती आम्ही मान्य केली आहे. या जीवनपद्धतीत आमची श्रद्धा व निष्ठा पूर्णपणे लोकशाही मूल्यांवर असल्याशिवाय आम्ही आमच्या सामर्थ्याचा ध्येयनिष्ठ दृष्टीने उपयोग करू शकणार नाही. सत्तेचा उपयोग जीवनसमृद्धीसाठी करण्यास लागणारी तत्त्वनिष्ठाही निर्माण होणे आवश्यक आहे.

भारतीय परंपरा व वैशिष्ट्ये, राष्ट्रीय व आन्तर-राष्ट्रीय स्थिती, राष्ट्रीय जीवनविकास या सर्व संदर्भातून आपल्या समाजाच्या कर्तव्याविषयी तात्त्विक व व्यावहारिक दृष्टीने विचार करणारी मंडळी आज आपल्या देशात नाहीत असे नाही. भारतात वैचारिक दारिद्र्य कधीच निर्माण होऊ शकणार नाही एवढी विचार-संपत्ती आमच्या राष्ट्राच्या परंपरेत समाहृत झालेली आहे. तेव्हा विचारवंतांची आज कमतरता आहे

असे म्हणणे योग्य होणार नाही. विचारवंतांच्या वैचारिक सम्पत्तीचा प्रत्यक्ष जीवनानुभवात प्रत्यय येणे आवश्यक आहे. तसे न झाल्यास बुद्धिनिष्ठ व्यक्ती अलिप्ततेचेच धोरण पत्करणार हे निश्चित.

### वैचारिक अराजकता नि गोंधळ

* राष्ट्रातील समाज–जीवनात घडणाऱ्या सर्व विचार प्रवाहांचे पडसाद पार्लमेंटमध्ये पडताना दिसतात. संसदेत होणारी चर्चा व तिची पातळी, विचार-प्रतिपादनाची पद्धती, वैयक्तिक टीका व चिखलफेक इत्यादींची उदाहरणे पाहिल्यानंतर पार्लमेंटमधील सभासदांमध्ये वैचारिक शिस्तीचा किंवा वैचारिक–समतोलपणाचा निश्चितपणे अभाव दिसून येतो; यात संशय नाही. जीवनस्पर्शी दृष्टी, सखोल अध्ययन, चिंतन, प्रतिपादनात विचारनिष्ठेची चमक, आणि कार्य–सातत्य आज सर्वोच्च समजल्या जाणाऱ्या संसद्-सभासदात देखील पहावयास मिळत नाही. या वैचारिक अस्थिरतेतून आजच्या लहान मोठ्या समस्या निर्माण झालेल्या आहेत. कच्छच्या रणाचा प्रश्न असो की शेख अब्दुल्लाच्या पासपोर्टची घटना असो, पाकिस्तानातून येणाऱ्या निर्वासितांचा प्रश्न असो की, गोव्याचा प्रश्न असो, कम्युनिस्टांची स्थानबद्धता, काँग्रेस–अंतर्गत धुमसत असलेली दुफळी, चीनची नीती व आमचे त्या विषयीचे धोरण, विद्यापीठ व महाविद्यालयांचे संप व बेशिस्त वर्तन या व अशा अनेक लहान मोठ्या समस्या निर्माण होण्याचे मूळ कारण म्हणजे राष्ट्रातील कल्पक, बुद्धिनिष्ठ व विचारवंतांची अलिप्त राहण्याची मनोवृत्ती हे होय. सत्ता व संपत्तीच्या संघर्षात विचारवंत व तज्ञ स्वतः शिरत नाही, परंतु तसा प्रयत्न केल्यास त्यांना ते मानवतही नाही ही वस्तुस्थिती असून देखील असे म्हणावे लागते की, जो पावेतो चिंतनशील, व्यवहार्य व मूलगामी विचारांनी दखल घेण्याची क्षमता शासनात निर्माण होणार नाही तो पावेतो प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष संकटांना राष्ट्र तोंड देऊ शकणार नाही; हे निर्विवाद आहे.

आंतर–राष्ट्रीय क्षेत्रातील समस्या सोडविण्यात आम्ही ज्या कुशलतेने वाटाघाटी करू त्यावरूनच राष्ट्राच्या शक्तीची कल्पना येऊ शकते. ही वैचारिक कुशलता वाढीस लावण्यासाठी देशातील विविध विचार-वंतांच्या कल्पनांचा राष्ट्रीय हित व सर्वांगीण विकास या दोहोंच्या संदर्भातून विचार झाला पाहिजे.

### शासन व विचारात सुसंवाद– ठळक उदाहरणें

**प्रे. केनेडी :** देशातील उपलब्ध विचारवंतांची तसेच तज्ञांची मत विचारात घेण्याचे महत्त्व कै. केनेडी यांनी पूर्णत्वाने ओळखले होते. वैचारिक क्षेत्रात ज्यांची गती आहे, प्रत्यक्ष शासन-कार्यात ज्यांचे अनुभव परिपक्व झाले आहेत अशा मूलगामी विचारप्रणालीचा ते यथाशक्ती स्वीकार करीत असत. राष्ट्रीय व आन्तर-राष्ट्रीय क्षेत्रात आपल्या अल्पशा कारकिर्दीत कै. केनेडींनी जे नेत्र-दीपक यश संपादन केले व शेवटी क्यूबाच्या प्रश्नाने तर त्यावर कळस चढविला त्यांच्या या सफलतेचे रहस्य त्यांच्या वरील मनोवृत्तीत आढळून येईल.

**प्रे. जॉन्सन :** नवे विचार व नव्या कल्पनांची देवाण घेवाण करण्याच्या तत्त्वावर प्रे. जॉन्सन यांचा फक्त विश्वासच नसून ते राष्ट्रीय-जीवनविकाराचे ते एक अंगीभूत तत्त्वच मानतात. विविध विषयात तज्ञ असलेल्या सत्तावीस जणांचे एक मंडळ त्यांच्या मदतीला असून नवे विचार व कल्पनांचा प्रवाह नेहमीच वहात रहावा यासाठी मुद्दाम ते प्रयत्नशील असतात. प्रो. रेजमन, मि. मार्गारेट मिट, मि. इजेन रेस्टो इत्यादी तज्ञांच्या मंडळावर मार्गदर्शन करण्याचे कार्य प्रिन्स्टन विद्यापीठाचे डायरेक्टर प्रो. इरिक गोल्डमन हे करीत असून राष्ट्रीय समस्यांच्या ध्येय धोरणाची दिशा निश्चित करण्याच्या दृष्टीने प्रे. जॉन्सन त्यांची मदत घेत असतात.

**श्री. विल्सन :** परंपरावादी ब्रिटनचे पंतप्रधान हेराल्ड विल्सन आपल्या पक्ष-सामर्थ्यात भर घालण्यासाठी तज्ञ व विचारवंतांचे मार्गदर्शन अचूक घेताना आढळून येतात. याबाबतीत जणू प्रे. केनेडी यांचाच आदर्श त्यांनी आपल्यापुढे ठेवल्याचे आढळून येते. सर सी. पी. स्नो यांच्यासारख्या परंपरावादी परंतु नव्या कल्पनांचे व विचारांचेही स्वागत करणाऱ्या तज्ञांची नेमणूक त्या दृष्टीने महत्त्वाची म्हणावी लागेल. जुजबी बहु-मताच्या तारेवरची कसरत करीत असताना आपला राज्यकारभार प्रभावीपणे चालविण्यात त्यांना अशाच

* श्री. भास्करराव यांच्या लेखावरून. ( Indian Express. )








विचारवंतांचे अमोल साहाय्य प्राप्त होत आहे द. गॉल-निर्मित युरोपात देखील आपले स्थान भक्कम करण्यात पंतप्रधान विल्सन यांना जे यश प्राप्त झाले त्याचे रहस्यही त्यांच्या याच मनोवृत्तीत आढळून येते.

श्री. द-गॉल : आन्तर-राष्ट्रीय क्षेत्रात फ्रान्सचे महासत्तेतील स्थान टिकविण्यासाठी प्रे. द-गॉल यांना एन्ड्रे माल्रेक्स सारख्या बुद्धिवंताचे अमोल साहाय्य लाभले आहे. जगातील राष्ट्रात चीन विषयींची इत्थंभूत माहिति असणारे फ्रान्स हे एकमेव राष्ट्र होय.

श्री. लुडविक : नव जर्मनचे निर्माते चान्सेलर लुडविक् एरहार्ड यांचे जवळ देखील उच्च शिक्षित तरुण विचारवंताचे मंडळ असून त्यांच्या मदतीने ते आपल्या विचारांची दिशा व योग्यायोग्यता ठरवून नंतरच आपले धोरण निश्चित करतात.

## भारतातील विचारवंत

स्वातंत्र्योत्तर काळात भारताच्या सर्वांगीण व अपेक्षित विकासाची गती मंदावण्याचे प्रमुख कारण म्हणजे आमच्यातील सत्ताधाऱ्यांची विचारवंतांविषयी व तज्ञांविषयी असलेली उदासीनता हेच होय. राज्यकर्त्यांनी केवळ राजकीय क्षेत्रातील व्यक्तीशीच सल्लामसलत करण्याच्या प्रवृत्तीमुळे राष्ट्रीय व आंतर-राष्ट्रीय ध्येय धोरणात स्पष्टपणा व बौद्धिक-समतोलपणाचा अभाव दिसून येतो. अलिप्त अशी समाजविमुख राजकारणी-लोकांची जातच निर्माण होऊ पहात आहे. पं. नेहरूनंतर तर हा कमीपणा अधिक जाणवत असल्याचे दिसून येते. स्वतः पं. जवाहरलालजी मात्र देशातील व परदेशातील विविध विषयातील तज्ञांचे व विचारवंतांचे मार्गदर्शन घेत असत. नेहरूनंतर मात्र सत्ताधारी व विचारवंतांतील आवश्यक तो सुसंवादी-दुवा नष्ट झाला असून त्या जागी दुरावा निर्माण झाला आहे. आजच्या गंभीर परिस्थितीत सत्ताधाऱ्यांचा सर्व थरातील विचाराशी सुसंवाद प्रस्थापित होणे अत्यंत आवश्यक आहे.

## औदासिन्याविरुद्ध बंड

सत्ताधारी व विचारवंतात सुसंवाद निर्माण होण्याची आवश्यकता केवळ राजकीय क्षेत्रातच नव्हे तर समाज-जीवनाशी संबंधित सर्व विषयांचे ध्येय धोरण ठरविण्यात देखील दोघातील सुसंवादी-मनोवृत्तीचा प्रत्यय येणे जरूरीचे आहे. कोणत्याही आदर्श कल्पनांना व धोरणाला वैचारिक मान्यता देण्याची व तेथेच थांबण्याची आमची पद्धती फार घातक आहे. आजच्या समाजातील वैचारिक-गोंधळ व उदासीनतेविरुद्ध देशातील जाणकार विचारवंतांनी रान उठवून स्वार्थी मनोवृत्तीचे तत्त्वज्ञान निर्माण करणाऱ्या व असत्याचे शास्त्र बनविणाऱ्या सैतानाशी दोन हात करण्याची तयारी ठेवली पाहिजे. असे झाले तरच देशात व परराष्ट्रात आमची वैचारिक-पीछेहाट बंद होईल व इतरांना टीकेला जागा रहाणार नाही.

स्पष्ट, व्यासंगपूर्ण व मूलगामी विचारांची व सल्ल्याची आवश्यकता कोणत्या क्षेत्रात भासते ते पाहून नंतरच त्याची उपयुक्तता सिद्ध करता येईल.

## चीन व भारत

भारताची सरहद्द प्रामुख्याने चीन व पाकिस्तानशी लागून आहे. भारताच्या उन्नतीच्या व विकासाच्या दृष्टीने शेजाऱ्याशी भांडण असणे केव्हाही घातक ठरणार आहे. पाण्यात राहून मगरीशी वैर साधून कसे भागणार ? तेव्हा काहीही झाले तरी एका बाजूस चीन व दुसऱ्या बाजूस पाकिस्तान ही राष्ट्रे शेजारी म्हणून रहाणारच व आम्हाला त्यांच्याच शेजारी राहणे भाग आहे हे कटु सत्य आम्ही खुल्या अंतःकरणाने मान्यच केले पाहिजे.

भारताला स्वातंत्र्य मिळाले ही फार महत्त्वाची घटना आहे परंतु त्याहीपेक्षा भारत एकसंघ राखणे हे अधिक महत्त्वाचे आहे. या दृष्टीने आपल्या सरहद्दीची मर्यादा स्पष्टपणे, परंपरागत तह व संस्कृती इ. च्या आधारांच्या कसोटीवर करून त्वरित निश्चित झाल्या पाहिजेत तसे झाल्यास सरहद्दीविषयीचे भांडण नाहीसे होऊन भारताला मानहानी पतकरण्याची पाळी येणार नाही. आन्तरराष्ट्रीय राजकारण फक्त मित्रत्वाच्या भावनेवर चालत नसून मित्रत्वाच्या भावनेतून अभिव्यक्त होणाऱ्या विचारांना प्रत्यक्ष कागदावर तहाचे मूर्तस्वरूप प्राप्त होणे आवश्यक आहे.

चीनशी आम्ही या पद्धतीने वागलो नाही. बांडुंग परिषदेत चीनच्या नकाशात आसाम हा भाग चीन-संघ-राज्याचा एक भाग म्हणून दाखविला गेला होता हे माहीत असूनही आम्ही मित्रत्वाच्या संबंधातून पुढे मागे ही चूक दूर करता येईल या भोळ्या आशेवर












राहिलो. " We were living in an artificial world of our own creation " हे पं. नेहरूंचे उद्गार आमच्यातील अदूरदर्शी विचारप्रणाली दर्शवित नाही काय ? १४ मार्च १८९९ रोजी चीनच्या राष्ट्रीय कार्यालयात सर क्लाऊड माग्डोनाल्ड यांनी दिलेले पत्र लंडनच्या पब्लिक-रेकॉर्ड ऑफिसमध्ये असून ( एफ्. ओ. आर. Volume No. F. O. १७। १३७३ ) त्यांत तज्ञानी भारत-चीन सरहद्दी अशा निश्चित केल्या आहेत की ज्यात चीनने बांधलेला रस्ता हा त्यांच्याच सरहद्दीत येत असून आज आमच्या ताब्यात असलेल्या सरहद्दी-प्रदेशापेक्षा अधिक प्रदेश आमच्या ताब्यात दाखवीत आला आहे. अक्साई-चीन हा भाग पत्रात नमूद केल्याप्रमाणे चीनचाच दाखविण्यात आला आहे. १८९९ च्या पत्राचा विचार त्या वेळच्या आन्तरराष्ट्रीय कायद्याच्या दृष्टीने केल्यास त्याच्या सत्यतेविषयी अनेक प्रश्न उपस्थित होऊ शकतात परंतु आमच्याकडील तज्ञानी व विचारवंतांनी त्याचा सर्व दृष्टीनी, सखोल अभ्यास केला आहे काय ? या पत्रांचा अभ्यास स्वातंत्र्यानंतरच्या काळात त्वरित केला असता तर वाटाघाटीच्या कौशल्याने देखील हा प्रश्न सोडविणे शक्य झाले असते, व प्रत्यक्ष संघर्षाची पाळी आली नसती. अजून देखील वेळ गेली नसून स्पष्ट, मूलगामी विचाराच्या आधारावर राष्ट्राच्या सार्वभौमत्वाला बाध न आणता मार्ग निघू शकतो. बाहेरच्या जगात भारत हा ' आक्रमक ' असल्याची भडक चित्रे रंगविणे त्यामुळ बंदही होतील.

## पाकिस्तान नि भारत

आमची हजारो मैलाची सरहद्द पाकिस्तानशी लागून आहे. भारताचाच तो एक भाग असल्यामुळे त्या देशाचे अंतरंग आम्हाला माहीत आहेत. दोन्ही देशांच्या सरहद्दी ज्या ठिकाणी मिळतात त्याच्या काही ठिकाणी गायरान व पडीत जमीन आहे. फाळणीच्या काळात तसेच स्वातंत्र्यानंतरच्या काळात या सर्व सरहद्दी प्रथम निश्चित करण्याचा आम्ही प्रयत्न न केल्यामुळे व दिवसेदिवस भारत-पाकिस्तान संबंध दुरावत चालल्यामुळे हा प्रश्न अधिक नाजूक बनला आहे. ' कायमची डोकेदुखी ' म्हणून बनलेला निर्वासितांचा प्रश्न आम्हास भेडसावित असून आमच्या आर्थिक-स्थैर्यास त्या मुळे फार मोठा धोका निर्माण झाला आहे. तेव्हा पाकिस्तानशी वाटाघाटी करून कुशल मुत्सद्देगिरीने आपले स्वातंत्र्य व सार्वभौमत्व अबाधित राखून हा प्रश्न सोडविणे हे विचारवंतांना व तज्ञांना आव्हानच आहे.

भारत पाकिस्तान संबंधाच्या दृष्टीने महाराष्ट्राचे माजी राज्यपाल श्री प्रकाश म्हणतात– The great quality of Democrasy is that– therein everything–small or great is discussed on an intellectual level. बुद्धिनिष्ठ दृष्टिकोनातून पाहिल्यास आजच्या परिस्थितीला कोण कारणीभूत आहे हे स्पष्ट होते. ते पुढे म्हणतात : "We must not forget however unpleasant that fact may be, and however much we may avoid thinking of it that it is the Cruel social system we Hindu have raised on our otherwise beautiful faith that has driven a third of our population to join other religions that afforded security and social equality ensuring to larance and brotherhood denied to them in their earlier sphere of life. The first result is emergence of Pakistan. Let there be not mistake that the process is still on. We may shut our eyes to it if we like, but large members of Hindus are still turning to other faith. Let us beware of other " stans ".

## बुद्धिनिष्ठ व तज्ञांची विविध क्षेत्रात आवश्यकता

भारताच्या विकासकार्यात अनेक विचारी व कल्पक व्यक्तींची आवश्यकता आहे. शासनास सक्रियतेची व दूरदर्शीपणाची जोड देऊन समाजाच्या निरनिराळ्या कार्यात ते नवे चैतन्य निर्माण करू शकतात. विविध पातळीवर निरनिराळे प्रयोग करून सातत्याने विकासकार्याला नव्या दिशा दाखवत राहिल्यास राष्ट्र विकास व समृद्धीच्या ध्येयाप्रद जाईल यांत शंका नाही.











## सत्ताधारी व विचारवंतात सुसंवाद

सर्व सामान्य नागरिकाला प्रत्यक्ष विकासकार्याविषयी विशेष आत्मीयता आढळून येत नाही. या कार्य-वैफल्यातूनच आमच्या तीन पंचवार्षिक योजना गेल्या असल्यामुळे सामान्य माणसात विकासाविषयी उत्साह व कार्य करण्याची जिद्द दिसून येत नाही. विविध विकासकार्याची माहिती देणारी माहिती-पत्रके, सुलभ व उपयोगी अशा कार्याची प्रात्यक्षिके करवून दाखवून देशाच्या काना कोपऱ्यात विकास कार्याविषयी आवड, उत्साह व प्रवृत्ती निर्माण करण्याचा प्रयत्न नव्या पायावर सुरू करता येण्यासारखा आहे. देशातील लेखक वर्ग, विविध क्षेत्रातील कलाकार आपापल्या शक्ति-बुद्धिप्रमाणे शासन व विकास कार्यात नवा प्राण निर्माण करू शकतात. बाहेरच्या देशात जाऊन ज्यानी विशेष ज्ञान प्राप्त केले आहे त्याचा उपयोग विशेषत्वाने होऊ शकतो.

भारतातील विद्यार्थी-जगात व तरुण संघटनेत नव्या तरुण विचारी, उत्साहमूर्ति व मार्गदर्शन करू शकणाऱ्यांची नितांत आवश्यकता आहे. भारतीय विद्यापीठातून व महाविद्यालयातून शिक्षण घेणारे लाखो तरुण सुट्टीच्या दिवसात निर्हेतुक जीवन घालविताना दिसतात. ' हा भारतीय-युवक-वर्ग मुळीच काही करू शकत नाही असा त्याचा अर्थ नसून त्यांच्या पुढे आकर्षक, मूलगामी व हितावह कार्यक्रम आम्ही मांडू शकलो नाही हेच त्याचे प्रमुख कारण आहे. भारताच्या युवकांना हवे आहेत प्रत्यक्ष कार्यक्रम अमलात आणणारे उत्साही, कल्पक, व धडाडीचे मार्गदर्शक व कर्मवीर.

सारांश विचारवंतांची व तज्ञांची आवश्यकता ज्या क्षेत्रात आहे अशांची यादी पुष्कळ वाढविता येईल. कार्यक्रमही देता येण्यासारखा आहे. राष्ट्राच्या प्रत्यक्ष कार्यात अशा कल्पक व तज्ञ मंडळींचा संबंध मात्र येणे जरूरी आहे.

### गुणात्मक लोकशाही

भारतात अनेक राज्यात पंचायत-राज्याचा प्रयोग चालू आहे, नव्हे ती एक मूर्त वस्तुस्थिती आहे. राज्याच्या मुख्यमंत्र्यापासून तर खेडेगावातील सरपंचापर्यंत सरळ संबंध प्रस्थापित झाला असून सत्तेचा हा वाटा अगदी साध्या परंतु अनुभव नसलेल्या नागरिकाच्या हाती आला आहे. सत्ता हेच सम्पत्ती प्राप्त करण्याचे सुलभ साधन असल्याचे अनुभवास आल्यामुळे सत्ते पाठोपाठ सम्पत्तीचाही लोभ निर्माण झाला व त्यासाठी दुष्ट-सुष्ट मार्गानी प्रयत्न झाले आमची लोकशाही १ वर्षानंतर देखील संख्यात्मक अधिक व गुणात्मक कमी असल्यामुळे साधनसुचितेचा विचार मावळल्यासारखा झाला आहे.

'आधीच मर्कट तशातहि मद्य प्याला' या न्यायाने घडलेल्या व घडत असलेल्या अनेक घटनातून हे सिद्ध होते की आम्ही सामर्थ्याची म्हणजेच सत्तेची वाटणी केली परंतु सत्तेचे दान ' सत्पात्री ' होईल हे सांगणे कठीण आहे. लोकशाहीतील या उणेपणाला कमी करण्यासाठी समाजातील संयमी, व विचारवंतांची शक्ती वाढीस लागणे आवश्यक आहे. सामर्थ्याला संयमाची व बुद्धीला भावनेची लगाम घालणे जरूरीचे झाले आहे.

### खेडे हा भारताचा पाया

खेड्यातील आजचा सरपंच गावातील वयोवृद्ध व अनुभवी तसेच शहाण्या लोकांचे विचार ऐकून घेण्यास तरी तयार असतो काय ? तालुक्याच्या पंचायत समितीत शिक्षकांचे काय स्थान आहे ? जिल्हा परिषद, जिल्ह्यातील विविध क्षेत्रात कार्य करीत असलेल्या तज्ञ, इंजिनीअर, प्राध्यापक, डॉक्टर आदींसारख्या विशेष-ज्ञान-प्राप्त मंडळींचा काही समाज-विकास कार्याकडे उपयोग करून घेण्याच्या स्थितीत आहे काय ?

सारांश विकेंद्रीकरणाच्या प्रयोगात जनशक्ती जागृत करण्याची व सारासार विचार करणाऱ्या मंडळींचे नियंत्रण निर्माण होणे आवश्यक आहे. हे कार्य आम्ही जितक्या लवकर करू तेवढ्या अल्पावधीत आम्ही आधुनिक भारताचे उज्ज्वल भविष्य घडवू शकू. मि. हेन्री बेगर्सने दिलेला संदेश महत्त्वाचा आहे. ते म्हणतात:--

**Act as men of thought and think as men of action.**

---








प्रा. मधुसूदन फडके

# औस्पेन्स्कीचा गूढवाद

## चरित्र व ग्रंथसंपत्ती

रशियन गूढवादी तत्त्वज्ञ पीटर डेमिॲनोव्हिच् औस्पेन्स्की याचा जन्म मास्को येथे १८७८ त झाला. निसर्गशास्त्राबरोबरच मानसशास्त्राचाही अभ्यास करून त्याने मास्को विद्यापीठाची पदवी घेतली. त्यानंतर वृत्तव्यवसायात शिरून त्याने लेखनास प्रारंभ केला. " चौथी मात्रा " ( The Fourth Dimension ) हा याचा पहिला गणितविषयक ग्रंथ १९०९ मध्ये प्रसिद्ध झाला. लहानपणापासूनच गूढवादाच्या दिशेने विकास होऊन १९१२ मध्ये त्याला काही ' अनुभव ' ही आला. याच वर्षी ' तिसरे तर्कशास्त्र ' ( Tertium Organum ) हा त्याचा दुसरा ग्रंथ प्रसिद्ध झाला.

सृष्टीचे स्वरूप दिसते त्याहून निराळे, गहन आणि अद्‌भूत आहे असा त्याचा दृढ विश्वास बनला. हे स्वरूप जाणून घेण्याचे काही विशिष्ट मार्ग आहेत; या वाटांनी जाणाऱ्या मंडळींचे पृथ्वीच्या पाठीवर ठिकठिकाणी ' संप्रदाय ' आहेत; त्या सर्वांची आकांक्षा एकच असल्यामुळे निरनिराळ्या प्रदेशातील साधकांचे संघ काही अंतस्थ सूत्रांनी निगडित झालेले असतात; साहजिक आपला अनुभव स्पष्ट व निश्चित करण्यासाठी या मंडळींचा उपयोग होईल आणि आपल्याला परमार्थाचा अचूक मार्ग सापडेल असे त्याला वाटू लागले. यास्तव पुढील दोन वर्षे फ्रान्स, इटली, इजिप्त, हिंदुस्थान व सिलोन या देशांचा – परिव्राट, फकीर व योगी यांच्या प्रदेशांचा – त्याने दौरा केला. श्रीरामकृष्ण परमहंसांच्या संप्रदायाप्रमाणे भारतातील अनेक साधकसंघाशी त्याने संपर्क साधला. " योग ही भारतीय गूढविद्येची गुरुकिल्ली आहे, " " भारतात अद्‌भुत आहे, पण ते उत्तम रीतीने लपवून ठेवण्यात आले आहे. " अशा तऱ्हेचे प्रशंसापर अभिप्राय त्याने आपल्या ग्रंथात व्यक्त केले आहेत. तरीदेखील परमार्थसाधनाच्या निरनिराळ्या पंथांतील उणीवाही त्याच्या अनुभवास आल्यावाचून राहिल्या नाहीत.

युरोपात महायुद्ध झाल्यामुळे १९१४ मध्ये तो परत आला आणि पौर्वात्य देशांतील अनुभव व त्यातून प्रवर्तित झालेले विचार यावर त्याने आपल्या देशात व्याख्याने दिली. पुढल्याच वर्षी मास्कोमध्ये गर्डजेफ या ग्रीक गूढवाद्याशी संपर्क येऊन त्याने त्याचे शिष्यत्व पत्करले. या सुमारास " विश्वरचनेचा नवा नमुना " ( A new model of the universe ) हा ग्रंथ त्याने लिहून काढला होता. या काळात त्याचे वास्तव्य पीटसबर्ग येथे होते.

१९१७ मध्ये रशियात कम्युनिस्ट क्रांति झाली आणि गर्डजेफ व इतर अनेक व्यक्तीप्रमाणे या गूढवादी तत्त्वज्ञाला परागंदा व्हावे लागले. काही वर्षे त्याचा पत्ताही लागेना. अखेर कॉन्स्टँटिनोपल येथे ज्या शेदीडशे रूसांनी आसरा घेतला होता त्यामध्ये १९२१ च्या सुमारास तो अत्यंत हलाखीच्या परिस्थितीत आहे असे कळले. त्यानंतर त्याला इंग्लंडमध्ये आश्रय मिळून ' तिसऱ्या तर्कशास्त्राची ' दुसरी आवृत्ती प्रसिद्ध झाली. इंग्लंडमध्ये गर्डजेफच्या सहकार्याने आपल्या तत्त्वज्ञानावर व्याख्याने देऊन त्याने ' गर्डजेफ इन्स्टिट्यूट'ची स्थापना केली. १९३१ मध्ये ' अद्‌भुताच्या शोधात ' ( In search of the miraculous ) हा ग्रंथ प्रसिद्ध झाला. त्यामध्ये त्याने गर्डजेफच्या तत्त्वज्ञानाचा परिचय करून दिला आहे.

१९३९ मध्ये दुसरे महायुद्ध सुरू झाले. तेव्हा तो इंग्लंडमध्येच होता. मध्ये जर्मनांनी लंडनवर बॉम्ब वर्षाव सुरू केला तेव्हा त्याने अमेरिकेस प्रयाण केले. तेथेही शिष्यवर्गाच्या साहाय्याने गर्डजेफ इन्स्टिट्यूटच्या धर्तीवर त्याने एक आश्रम स्थापन केला आणि व्याख्यानाच्या व विवादाच्या द्वारा आपल्या तत्त्वज्ञानाचा तो आमरण प्रचार करीत राहिला. १९६४



अनुक्रमणिका






मध्ये त्याची जीवनयात्रा आटोपली. " चौथा मार्ग " ( The fourth way ) हा त्याच्या व्याख्यानावर व संभाषणावर आधारलेला ग्रंथ त्याच्या मरणोत्तर दहा वर्षांनी प्रसिद्ध करण्यात आला.

## अध्यात्मवाद

जाणणारा आत्मा आणि जाणावयाचे जग या वस्तू स्वतंत्र असल्या तरी ज्ञानाच्या दृष्टीने आत्म्यालाच महत्व आहे. जगाला स्वतंत्र ' अस्तित्व ' असले तरी त्याचे ' स्वरूप ' आत्म्याच्या जाणिवेहून वेगळे काढता येत नाही. सृष्टीचे ' स्वरूप ' बघण्यासाठी आपल्या जाणिवेतच डोकावले पाहिजे.

अस्तित्वाप्रमाणे जगाचे स्वरूपही जाणिवेशी संबंधित नसून स्वतंत्र आहे असे वस्तुवादी ( Positivists ) सांगत असतात. त्यांच्या मते सारी सृष्टी जड द्रव्य आणि शक्ती यानी गजबजलेली, त्रिपरिमाणात्मक म्हणूनच परिमेय आहे. तथापि सृष्टीचे हे वर्णन अनुभवाशी जुळत नाही. जड द्रव्य आणि शक्ती या केवळ एकांगी कल्पना आहेत. सृष्टी त्रिपरिमाणात्मक असून तिचा गणित पद्धतीनी हिशेब देता येतो असे मानण्यास जागा सापडते याचे कारण सृष्टीचे सांगोपांग दर्शन आपल्याला घडलेले नसते. आपली बुद्धि मर्यादित म्हणून सृष्टीच्याही मर्यादित स्वरूपाचेच आपण वर्णन करू लागतो. वस्तुतः ते तिचे अंतिम स्वरूप नव्हे. जाणिवेचा विकास होईल तशी सृष्टीची अनोळखी अंगे दिसू लागतील. आत्मज्ञान वाढेल तसे सृष्टीचेही ज्ञान वाढत जाईल आणि तिचे चैतन्यमय, अपरिमेय आणि अद्‌भुत स्वरूप प्रत्ययाला येऊ लागेल.

गणितशास्त्र आणि पदार्थविज्ञान हे वस्तुवादाचे मोठे आधार. त्याचेच स्वरूप मुळी आजमितीला बदलून गेले आहे. आजचे गणितशास्त्र अध्यात्मविद्येकडे झुकत आहे आणि आजचे पदार्थविज्ञानदेखील आपल्या जुन्या कल्पना दुरुस्त करीत आहे. उदाः— त्रिपरिमाणात्मक सृष्टी खरी नव्हे; काळ ही सृष्टीची चौथी बाजू आहे. असे सापेक्षतावाद सांगत आहे. तथापि चतुर्मात्रात्मक सृष्टी हादेखील एक भासच आहे. भूत, वर्तमान आणि भविष्य या मार्गाने धावणारा रेषाकार काळच परमार्थाने खरा नाही. खरा काळ म्हणजे अनंत वर्तमान !

नवे तर्कशास्त्रदेखील जुन्याला ओलांडून पुढे चालले आहे. विचार स्वतःसंगत असावा हा ॲरिस्टॉटलचा आदेश; विचार वस्तुसंगत असावा ही बेकनची घोषणा; परंतु ' खरे ' सत्य संगती विसंगतीच्याही पलीकडे आहे. हेच तिसरे तर्कशास्त्र !

## मानसिक पद्धती

वस्तुज्ञानात वस्तूप्रमाणे तिच्या मनावरील परिणामालाही महत्त्व असते. त्यामुळे केवळ वस्तुनिष्ठ दृष्टीला घडणारे सृष्टीचे दर्शन अवास्तव असू शकते. ' चक्षुर्वैसत्यम् ' ही एक भाबडी निष्ठा आहे. जे सयुक्तिक ते सत्य हीदेखील एक आग्रही श्रद्धा आहे. ज्ञानेंद्रियप्रवृत्ति आणि तर्कबुद्धी यांच्याप्रमाणे प्रतिभा ही देखील एक ज्ञानशक्तीच आहे. त्यामुळे प्रयोगशील शास्त्रज्ञ व चिंतनशील तत्त्वज्ञ यांच्याप्रमाणे कल्पक आणि भावनाशील कलावन्तालाही सृष्टीच्या स्वरूपाचा साक्षात्कार घडू शकतो किंबहुना त्याच्या ठिकाणी काही एका निराळ्या जाणिवेचा उदय झालेला असतो आणि " तात्त्विक " बुद्धीपेक्षा "व्यावहारिक" दृष्टीच्या अशा माणसाला सृष्टीचे स्वरूप अधिक चांगले समजते !

सृष्टीला पलीकडची परिमाणे आहेत. त्यांचे ज्ञान होण्यासाठी अधिकाधिक समृद्ध जाणिवेचा उपयोग करणे याचेच नाव मानसिक पद्धति. ( Psychological method )

## अतिमानव

प्राणिमात्राच्या मानसिक शक्तींचा विकास होतो तसतशी सृष्टी त्याला निराळी व अधिकाधिक सत्यस्वरूपात दिसू लागते. सरपटणाऱ्या प्राण्याला सृष्टीचे एकच परिमाण दिसते; चतुष्पाद प्राण्यांना दोन; तर्कशील मनुष्यप्राण्याला तीन दिसतात; आता कोणाला चौथे परिमाण दिसू लागले आहे. जाणिवेचा अधिक विकास होईल तसे सृष्टीचे परात्परस्वरूप दिसत जाईल. ज्याच्या ठिकाणी अशा प्रकारची प्रौढ जाणीव उत्पन्न झाली, ज्याला जगताची नवी परिमाणे दिसू लागली आणि सृष्टीचे अद्‌भुत स्वरूप ज्याच्या प्रत्ययास येऊ लागले तो अतिमानव ( Superman ) होय. असा मानव उत्क्रान्तीच्या सर्गात उत्पन्न होणे अपरिहार्य



अनुक्रमणिका






आहे. तो उदयाला येणार अशी स्वप्ने मनुष्यजातीला शतकानुशतके पडत आली आहेत. वस्तुतः असे अतिमानव आजही आपल्या समाजात वावरत असतील. ते सामान्य लोकांना ओळखतील पण सामान्य त्याना ओळखू शकणार नाहीत.

## गूढतंत्रपद्धती

सृष्टी अद्‌भुत आहे. तिच्या अद्‌भुत स्वरूपाचा प्रत्यय अनेक व्यक्तींना निरनिराळ्या काळात आलाही आहे. आपापल्या गूढ अनुभवांची त्यानी केलेली वर्णनेही परस्परांशी जुळणारी आहेत. अद्‌भुताचा प्रत्यय घेण्याचे निरनिराळे मार्ग, निरनिराळ्या गूढतंत्रपद्धति ( Esoteric methods ) निरनिराळ्या भूभागात प्रचलित आहेत. उदा. खिश्चनांची परिव्रज्या; मुसलमानांची फकीरी व हिंदूंचा योग. आत्मिक शक्तीचा विकास हेच त्यातील समान सूत्र आहे.

किंबहुना सामान्य मानवी जीवनाच्या परिघात अलौकिकतेचे एक अंतर्वर्तुळ नेहमीच असते. कर्मठ बुद्धिवादी विचारसरणीचा अमल कमी झाल्यास एकाद्याचा या वर्तुळात प्रवेश होतो. तो एक नव्या कक्षेत सामील होतो. त्याच्या बुद्धीची झेप उंचावते आणि आपणात काही आमूलाग्र परिवर्तन झाले आहे असे त्याला दिसू लागते. हीच खरी उत्क्रान्ती.

## वैवाहिक जीवन

सृष्टीच्या सत्यस्वरूपाचा साक्षात्कार होण्यातच जीविताची सफलता आहे. इतर उद्दिष्टांची सफलता केवळ साधनीभूत असते. उदाहरणार्थ, सुप्रजोत्पत्ति आणि वंशरक्षण याहीपेक्षा परस्परसंपर्काने होणारा पतिपत्नींचा आत्मिक विकास आणि त्यातून घडणारा सत्यसृष्टीचा साक्षात्कार हाच वैवाहिक जीवनाचा चिरंतन महत्त्वाचा परिणाम होय.

लैंगिक दृष्टीने काही व्यक्ति अधःकाम ( Infrasex ) असतात. त्यात पुरुषी बायका व बायकी पुरुष यांची गणना करिता येईल. स्वाभाविक लैंगिक प्रवृत्तीच्या व्यक्तींशी अशा विपरीत व्यक्तींची गाठ पडल्यास वैवाहिक जीवन उध्वस्त होते यास्तव विवाहाचे हेतु सफल होण्यास अनुरूप स्त्री-पुरुषांची लग्नगाठ पडणे अगत्याचे ठरते. या बाबतीत मनूने सांगितलेले दंडक विचारार्ह ठरतात असा औस्पेन्स्कीचा अभिप्राय आहे !

उध्वस्त वैवाहिक जीवनाप्रमाणेच अनुरूप स्त्री-पुरुषांच्या लैंगिक अनुभवातही विषादाची छटा राहून जाणे अपरिहार्य असते. या विषादातच परस्परांच्या मानसिक विकासाचे बीज असते. अशा अनुभवांमुळेच व्यक्ती वीतकाम ( suprasex ) होतात आणि त्यांना एका नव्या प्रकारच्या जाणिवेची प्राप्ती होते.

अशा प्रकारची ‘ निष्कामता ’ संसारात राहून देखील मिळविता येते. देहाला कष्ट देऊन मुसलमान फकीर निर्धारशक्ती कमावतो; ईश्वरावर निष्ठा ठेवून खिश्चन साधु भावनांचे नियंत्रण करतो; अवधान केंद्रित करून हिंदु योगी अलौकिक बुद्धि संपादन करितो; परंतु या तीन्ही मार्गात संसाराचा परित्याग आवश्यक आहे. त्याहून श्रेष्ठतर असा हा ‘ संसारातील संन्याशाचा ’ मार्ग आहे. हाच चौथा मार्ग होय !

## समाजरचना

सर्वच माणसांना अतिमानवाची पदवी प्राप्त होईल असे नव्हे. सर्व माणसे मुळात सारखी नसतात. त्यामुळे प्रत्येकाच्या प्रगतीचा पल्ला निराळा असतो. साहजिक सामान्य व असामान्य हा भेद समाजात राहतो आणि मनुष्याच्या मानसिक ठेवणीप्रमाणे त्याची निरनिराळ्या वर्गात विभागणी होते. या संदर्भात हिंदूंच्या जुन्या समाजरचनेचे मनूने घालून दिलेले दंडक औस्पेन्स्कीला पुनः उल्लेखनीय वाटतात. मनूने सांगितलेली वर्णव्यवस्था निसर्गप्रवृत्तींना धरून आहे. कोणाला आवडो, न आवडो कोणत्याही समाजाची विभागणी चार वर्णात होतच असते. सामान्य व असामान्य यातील झगडे अटळ असल्यामुळे ही नैसर्गिक समाजव्यवस्था मोडण्याचेही यत्न होतात. पण ते समाज स्वास्थ्यास हानिकारक ठरतात. त्यामुळे जेव्हा जेव्हा समाजाची घडी विसकटते तेव्हा तेव्हा ती पुनः नीट बसविण्यासाठी वरिष्ठ वर्णांना पुढाकार घ्यावा लागतो !

---

श्री. गणेश उमाकांत थिटे

# अर्वाचीन संस्कृत साहित्य-

संस्कृतसाहित्याचा इतिहास प्रायः जगन्नाथपंडित ह्या कवीपर्यंत मानला जातो. येथून पुढे मात्र संस्कृत साहित्यात काहीच निर्मिती होत नव्हती असे नाही. खरे म्हटले तर जगन्नाथपंडिताच्या आधी चार–दोन शतके संस्कृतमध्ये ज्या प्रकारची व दर्जाची काव्य-निर्मिती होत होती तशीच ती जगन्नाथपंडितानंतरही जवळजवळ आजपर्यंत होत आलेली आहे. तरी जगन्नाथानंतरच्या काव्यनिर्मितीचा वेगळा उल्लेख करून 'अर्वाचीन' अशी संज्ञा देण्यात येते. ह्या काल-खंडातील साहित्यकृतीचा अभ्यास साहित्येतिहास समजून घेण्याच्या दृष्टीने अर्थातच उपेक्षणीय नाही. पण ह्या कालखंडात मुळातच काही 'थोर' निर्माण झालेले नसल्यामुळे त्या साहित्याची विद्वान किंवा रसिक दोघांनीही उपेक्षा केली आहे त्यात अस्वभाविक काहीच नाही. अर्वाचीन कालखंडातील काव्यकृतींचा अभ्यास काही मंडळींनी केलेला आहे. त्यात काही संस्कृतचे प्रचारक ह्या काव्याला विनाकारण चांगले म्हणू इच्छितात असेही दिसते. तटस्थ भूमिकेवरून आणि समजुतदारपणे ह्या कालखंडातील साहित्यकृतींचे मूल्यमापन, त्या त्या कवींची परिस्थिती, साहित्याचे सामान्य गुणदोष ह्यांचे अवलोकन उद्बोधक ठरेल. त्या दृष्टीने एक प्रयत्न प्रस्तुत लेखात केलेला आहे.

## वैचारिक लेखनाचा विचार अप्रस्तुत–

अर्वाचीन संस्कृत साहित्याचा समग्र अभ्यास करायचा झाल्यास वास्तविक पाहता न्याय, वेदान्त, व्याकरण, साहित्यशास्त्र इत्यादि शास्त्रात झालेल्या टीका-उपटीका इत्यादि प्रकारच्या गंभीर साहित्याचाही परामर्श घ्यावयास हवा. तरीही साहित्येतिहासात प्रामुख्याने ललित साहित्याचा व तदनुरोधाने वैचारिक लेखनाचा अभ्यास करण्याची पद्धत असल्याने वैचारिक लेखनाचा विचार ह्या लेखापुरता अप्रस्तुत आहे. अर्थातच त्याच्या अभ्यासाचे महत्त्व नाकारण्याचा हेतु नाही हे उघडच आहे.

## पार्श्वभूमी

अर्वाचीन कालखंडाच्या कितीतरी आधी संस्कृत साहित्याला उतरती कळा लागलेली होती. भवभूती हा शेवटचा थोर साहित्यिक (व नाटककार). त्याच्यानंतर झालेली संस्कृतसाहित्यनिर्मिति ही प्रायः अनुकरण व कृत्रिमता ह्यांवर भर देणारी होती. कालिदास, अश्वघोष, भर्तृहरि इत्यादिकांच्या साहित्यातील साधेपणा नष्ट झाला होता. किरातार्जुनीय, शिशुपालवध ह्यासारखी चित्रमय काव्ये अधिक आकर्षक वाटू लागली होती; आणि काव्यनिर्मिति करणाऱ्यांचे आदर्श ही काव्ये होती. किरातार्जुनीय-शिशुपालवध-हरविजय हे महाकाव्याच्या चित्रमयतेचे तीन वाढते टप्पे ह्या दृष्टीने महत्त्वाचे आहेत. पूर्वीच्या कवींपेक्षा वरचढ ठरणे, त्यांनी केलेल्या कृत्रिमतेपेक्षा अधिक कृत्रिमता करून दाखवणे अशा प्रकारची महत्वाकांक्षा कवींमध्ये असे. त्यामुळेच पाल्हाळिक वर्णन, शब्दार्थांच्या कसरती, हे दोन महत्वाचे विशेष साहित्याच्या सर्वच क्षेत्रात शिरले.

ऋग्वेद, अथर्ववेद ह्यातील काही सूक्तांत आपणाला जिवंत काव्य आढळते. ह्या वेदातील तत्त्वज्ञानात्मक सूक्तातही एकप्रकारची वैचारिक मुक्तता दिसते. उपनिषदांचा जुना भागही अशाच काव्यमयतेने व वैचारिक मुक्ततेने युक्त आहे. ह्या दोहोंच्या मधल्या कालखंडात यज्ञप्राधान्याचा अतिरेक झाल्याने साहित्याला ओहोटी लागली होती. पण ह्याचवेळी महाभारत, रामायण ह्यांची स्थूलरूपात रचना होत होती. सांकेतिकपणा, कृत्रिमता इत्यादी दोष महाभारतात दिसत नाहीत व जेथे दिसतात तो भाग नंतर प्रक्षिप्त झालेला आहे हे उघड आहे. रामायणापासून आलंकारिक काव्यरचनेला सुरुवात होते तरी खुद्द रामायणावर ही आलंकारिकता बाहेरून कुठून लादलेली नसल्यामुळे आणि ही आलंकारिकता तुलनेने सौम्य असल्याने रामायण हे कृत्रिम आहे असे पूर्णपणे म्हणता येत नाही. पुढील काव्यांना रामायण-महाभारत हीच काव्ये उपजीव्य ठरली आहेत.

कालिदास, भर्तृहरि, अमरू ह्यासारखे कवी आपल्या स्वतंत्र अशा काव्य वैशिष्ट्यांनी थोर ठरले. कुठल्याही प्रकारची अतिरिक्त कृत्रिमता किंवा अंध अनुकरण ज्यांनी केले नाही ते कवी संस्कृत साहित्यात



अनुक्रमणिका

मानाचे स्थान मिळवून बसले. ह्याच संदर्भात गद्याच्या क्षेत्रात पंचतंत्र-हितोपदेशकार, दण्डिन् ह्यांची नावे नाटकाच्या क्षेत्रात भास, शूद्रक, विशाखदत्त, भट्ट-नारायण, आणि भवभूति ह्यांची नावे घेता येतील. कालिदासानंतर महाकाव्य हा प्रकार मात्र घसरला त्यामुळे कालिदास हाच शेवटचा थोर महाकवि.

साहित्यशास्त्रीय विचारांची पार्श्वभूमी पाहिल्यास असे दिसेल की ध्वनिकारानंतर महत्त्वाचा व स्वतंत्रप्रज्ञेचा साहित्यशास्त्रज्ञ नाही. पुढील विचारवंतांनी केवळ ध्वनिकाराच्या मतांचे स्पष्टीकरण, सुधारणा, व्यवस्थित मांडणी (क्वचित् विरोध) अशा रीतीने 'वार्तिककाराचे काम' केले. मम्मट, विश्वनाथ ह्यासारखे नावाजलेले साहित्यशास्त्रज्ञ ध्वनिकारांचे कार्य पूर्णतया तडीस नेताना दिसतात. ध्वनिकार, मम्मट, विश्वनाथ ह्या सर्वांना चित्रकाव्याबद्दल तिरस्कार आहे. पण पुढील सर्व साहित्यशास्त्रज्ञांचा अधिक वेळ चित्रकाव्याच्या चर्चेत जातो. मम्मट, विश्वनाथ, जगन्नाथ, ह्यांचे साहित्यशास्त्रीय ग्रंथ पाहिले की चित्रकाव्यमीमांसेचे एवढे प्रस्थ ह्यांनी का माजवावे ते कळत नाही. ह्याच अनुरोधाने उत्तरोत्तर झालेली काव्यनिर्मिति ही चित्रमयच आहे (शब्दचित्र किंवा अर्थचित्र) हे लक्षात घेऊन काही उलगडा होऊ शकतो.

## ही पार्श्वभूमी अर्वाचीन कालात अनुवृत्त

अर्वाचीन कालखंड आपण वेगळा काढला असला तरी अर्वाचीन काव्यात वेगळेपणा काही आढळत नाही. शतकानुशतके आहे तीच परिस्थिती चालू राहिली होती. साहित्य, साहित्यशास्त्र, तसेच इतरही शास्त्रे, तत्त्वज्ञाने ह्या कुठल्याच क्षेत्रात प्रगति म्हणून काही झालेली नाही ही गोष्ट भारतीय इतिहासाभ्यासकास सुपरिचित आहे, अर्वाचीन काळातील संस्कृत काव्य हे अर्थातच ह्या सर्वसामान्य स्थितीच्या बाहेरचे नव्हते. त्यामुळे आपल्याला फार आश्चर्य वाटणार नाही तर निराशाच पदरी पडते.

ह्या वस्तुस्थितीची कारणमीमांसाही केली गेलेली आहे. श्रुतिस्मृतिप्रामाण्य, दळणवळणाची दुष्करता, कर्मसिद्धांत, राजकीय पारतंत्र्य, समुद्रसंचारबंदी, विज्ञानवादाचा अभाव इत्यादी अनेक कारणे कमी अधिक भर देऊन मांडली गेली आहेत. अर्थातच ती विचारसरणी येथेही गृहीत धरावयास हरकत नाही. संस्कृत साहित्याचा विकास न होण्याचे एक महत्त्वाचे कारण असे सांगितले की ह्या साहित्याला दुसऱ्या कोणत्याही भाषेतील साहित्यापासून फायदा होऊ शकलेला नाही. इतर भाषेतील साहित्याशी संबंध येण्यामुळे नवीन नवीन महत्त्वाकांक्षा निर्माण होतात, ध्येये बदलतात. त्यातून नवा मार्ग सापडतो. हे संस्कृतच्या बाबतीत घडू शकले नाही. एतद्देशीय प्राकृत भाषांतील साहित्य हे स्वतःच मुळी संस्कृतकाव्यावर जगणारे होते. त्या काव्याचा संस्कृतवर परिणाम होण्याऐवजी संस्कृत साहित्यातील दोषांचाच त्यांच्यावर परिणाम झाला. तेही कृत्रिम व परपुष्ट होत राहिले. म्हणूनच पाली-साहित्यातील सुत्तपिटकासारख्या जुन्या भागात काही ठिकाणी जे स्वाभाविक सौंदर्य आहे ते पुढील काळात निर्माण झालेल्या "जिनालंकार" ह्यासारख्या संस्कृतसाहित्यातील कृत्रिमता पालीत आणू पाहणाऱ्या क्रीडाकाव्यात दिसत नाही. प्राकृतभाषा ह्या संस्कृत भाषेपेक्षाही अधिक मृत होत्या.

प्रादेशिक भाषांतील साहित्यात काही नवे नवे विचार मधून मधून आले. संतांनी निर्माण केलेल्या काव्यात थोडा वेगळेपणा जाणवतो. संतांपैकी काहींनी संस्कृतभाषेविरुद्धही उद्गार काढले. पण ते उद्गार खरोखरीच्या चिडीतून निघालेले नव्हते. संतसाहित्यातील विचारप्रणाली हीही पूर्णपणे वेगळी नव्हती. पुढे पुढे तर संतसाहित्याचा एक साचा ठरून गेला आणि त्या साचानुसार पाल्हाळिक पुनरुक्तिमय अनेक साहित्यनिर्मिती झाली. अर्वाचीन कालखंडात संस्कृतमध्ये जितकी काव्यनिर्मिती होत होती त्यापेक्षाही अधिक प्रमाणात प्रादेशिक भाषात होत होती, तरीही संस्कृत काव्यांचाच आधार त्यांना लागे. अशा परिस्थितीत प्रादेशिक भाषांचा परिणाम संस्कृतवर होऊन संस्कृतात काही वेगळे होणे अशक्यच होते.

## अर्वाचीन कालखंड : परिस्थिती

अर्वाचीन संस्कृतसाहित्याचा कालखंड बऱ्याच प्रमाणात राजकीय पारतंत्र्याचा आहे. हे पारतंत्र्य मुख्यतः मुसलमान व इंग्रज ह्यांच्यामुळे निर्माण झालेले होते. राजकीय पारतंत्र्यामुळे मुळातच सुरू झालेल्या वैचारिक मंदतेची अधिकच वाढ झाली. पण संस्कृत



अनुक्रमणिका








काव्यामध्ये नवनिर्मिती न होण्याचे खापर राजकीय परिस्थितीवर फोडून मोकळे होता येणार नाही येथील माणसांचा दोषही आपण पाहिला पाहिजे. कारण ज्या काही प्रदेशांवर स्वकीयसत्ता मधूनमधून किंवा अविच्छिन्नपणे होती, तेथे तरी साहित्याची प्रगती होत होती असे नाही. शिवाय संस्कृतकाव्याच्या अधःपतनाला सुरुवात झालेली आहे ती मुळी स्वकीय राजांच्या सत्तांमध्येच. पुढील लोकांनी ही संस्कृत-साहित्याची अधोगती तशीच होऊ दिली नाही, जागृती येऊ दिली नाही इतकेच. आणि आजही भारत स्वतंत्र झाल्यावर संस्कृत साहित्यात फारशी प्रगती होत आहे, किंवा फरक झालेला आहे असे नाही. त्यामुळे संस्कृत साहित्याला गेली कित्येक शतके स्वकीय काय, परकीय काय दोन्ही सत्तांचा सारखाच अनुपयोग झालेला आहे.

ह्या कालखंडातील सामाजिक परिस्थिती शतकानुशतके जशी चालत आली होती, तशीच होती. संस्थानिक, सरदार, पाटील, देशमुख, जमीनदार, व्यापारी ह्यासारख्या अर्थसमृद्ध लोकांचा एक वर्ग व दुसऱ्या बाजूला कामगार, किंवा शूद्र हा एक वर्ग. ह्यामध्ये आर्थिकदृष्ट्या फारसे समृद्ध नव्हेत पण समाजात मान–मरातब काही अंशाने असलेला ब्राह्मणवर्ग होता. ह्या वर्गाकडेच संस्कृत विद्या प्राधान्याने होती, व त्यातील काहीजण साहित्य निर्मिती करीत. ब्राह्मण समाजातील फक्त पुरुषांपुरतेच हे क्षेत्र मुख्यतः मर्यादित होते. संस्कृतचा वारसा ज्यांच्याकडे होता, त्यातील सर्वच संस्कृतचे गाढ अभ्यासक, किंवा निष्ठावंत उपासक, जिज्ञासु, कार्यप्रवण नव्हते. केवळ उपजीविकेचे साधन म्हणून संस्कृत किंवा वेदविद्येकडे पाहिले जाई. शिवाय ही उपजीविकाही सर्वांना सारख्याच प्रमाणात किंवा समाधानकारक रीतीने मिळत असे अशी स्थिती नव्हती. सर्व समाजजीवनच इतके थिजलेले, नवनिर्मितीस प्रतिकूल, आणि वांझ होते की प्रामाणिक व बुद्धिमान मनुष्यही फार तर परंपरेचे रक्षण करी, विद्याग्रहण व विद्यादान करी. पण खरोखरीची नवीन भर टाकण्याची पद्धतीच नव्हती. शास्त्रीय विचारात काय किंवा ललित साहित्यात काय " योग " घडत नव्हता. " क्षेम " सुद्धा शंभर टक्के झाला नाही आणि जुन्या कित्येक चांगल्या गोष्टींना आपण आज मुकलो आहोत.

शतकानुशतके येथील वर्गव्यवस्थेत काही बदलच झाला नाही. समाजजीवनात बदल होत नसल्याने विचारात किंवा कलात काही नवे होईल ह्याची शक्यता अर्थातच नव्हती. नवीन मार्ग प्रस्थापना करण्याचे काम फक्त परमेश्वरच अवतार घेऊन करू शकतो अशी श्रद्धा होती. वैचारिक क्षेत्रात जवळजवळ इसवी सनानंतर सर्वव्यापी परिणाम करणारी व्यक्ति भारतात झाली नाही. जे थोर झाले, ते जुन्याची घडी व्यवस्थित बसवणारे, भाष्यकार, राजकीय विजेते ह्या प्रकारचे होते. संपूर्ण नवीन विचारप्रणाली की जिच्या योगे समाजजीवन व साहित्य, कला ह्यात फरक पडेल अशी— इंग्रज भारतात आल्यानंतरच भारताला मिळाली; आणि ह्या नवीनतेचा अद्यापिही संस्कृत साहित्यावर फार थोडाच परिणाम झालेला आहे.

संस्कृत भाषा मृत झालेली होती हेही संस्कृत भाषेच्या प्रगतीस अनुकूल नव्हते. मृत ह्या अर्थाने की तिचा प्रचार, वापर अत्यंत थोडा जवळजवळ नाही असा होता. काही पंडित, काही काळ, काही वेळा संस्कृतचा वापर करीत. सर्वच कृत्रिम, व बळेच करावयाचे, असे असल्याने संस्कृतमध्ये काव्य निर्मिति होणार ती कृत्रिमच हे ओघाने येते. केवळ दैनंदिन व्यवहारच नव्हे, तर अर्वाचीन काळात साहित्यनिर्मितीची भाषा म्हणूनही संस्कृत मृत झाली होती. प्रादेशिक भाषातील साहित्य फारच वेगाने वाढत होते. प्रादेशिक साहित्याला लोकप्रियता मिळत होती. ते काव्य सर्वच जातीचे लोक कमी अधिक प्रमाणात वाचू किंवा जाणू शकत होते. त्यामुळे आपापल्या भाषात साहित्यनिर्मिती करण्याची हौस अधिक वाढू लागली. संस्कृत काव्य वाचणार कोण अशी परिस्थिती होती. पारंपरिक अध्ययनपद्धतीत जुन्या काव्यकृती स्थान मांडून बसल्या होत्या. नवीन निर्माण होणारे काव्य विद्वान लोक आणि शास्त्रीमंडळी " बोद्धारो मत्सरग्रस्ताः " ह्या न्यायाने तुच्छ मानत होते. आणि मुळातच ह्या काव्याची उंची फारशी नसल्याने मत्सरहीन, अभिज्ञ, सहृदय असा रसिकही त्याकडे आस्थेने पाहू शकत नव्हता. संस्थानिक, राजे, हे केवळ उपचार म्हणून संस्कृत काव्याला कधीकधी स्थान देत. पण त्यानाही ह्या काव्याचे महत्त्व सण,








समारंभ, वाढदिवस, षष्ठ्यब्दीपूर्ती ह्यासारख्या निमित्ताने आणि केवळ उपचार म्हणूनच असे. राजे, संस्थानिक ह्यांच्याकडे ज्याप्रमाणे पोपट, मोर, हत्ती, गवई, नायकिणी असत तसे संस्कृतपंडित किंवा कवि असत. पण त्याबद्दल विशेष आस्था नव्हती. "अन्नोधोपहताश्चान्ये" ह्या उक्तीनुसार इतर सर्वसामान्य लोक ह्या काव्याकडे पाहत नसत व त्यांना प्रादेशिक भाषेतील साहित्य मिळत असेच. दळणवळणाची, मुद्रणाची सोय नसल्याने हे काव्य शेवटी कोपऱ्यातच पडून राही. पुढे मुद्रणाची सोय झाल्यावर मात्र काही संस्कृत साहित्य बऱ्याच लोकांना वाचावयास मिळू लागले. पण हे साहित्यही प्रासंगिक, किंवा क्वचित वर्तमानपत्री असल्याने चिरंतन होण्याजोगे नव्हते.

## अर्वाचीन कालखंडातील कवि व काव्य : सामान्य वैशिष्ट्ये

"शास्त्रेषु हीनाः कवयो भवन्ति" ही ओळ अर्वाचीन कालखंडातील कवींच्याबाबतीत बरीच यथार्थपणे लावता येईल. मूलतः कविप्रकृती नसलेले पण काव्य करण्यास प्रसंग उपस्थित झाल्यामुळे, किंवा दुसऱ्याच्या विनंतीवरून किंवा स्पर्धेने काव्यास प्रेरित होणारे कवि अधिक दिसतात. शास्त्रीय घटपटादी खटपटीत आळसाने किंवा बौद्धिक अक्षमतेने उणे पडलेले लोक संस्कृत साहित्यनिर्मितीत पडत. (आणि आजही स्थिती बदललेला नाही, हे पुढे येईलच.) मूलतः प्रामाणिक व कविप्रकृति असलेल्यांचे "अशिक्षितपटुत्व", आवेश, उत्साह, सहजता, हे गुणधर्मही त्यांच्यात नसत आणि कवित्वशक्तीचा विकास करून, घासून पुसून परिपक्व, प्रौढ, परिपूर्ण झालेली कालिदास, भट्टनारायण इत्यादी कवींसारखीही क्षमता त्यांच्यात नव्हती. लहानपणी रघु-किरात-माघ इत्यादी काव्ये, कादंबरी, चारदोन नाटके त्यांनी वाचलेली असत. त्याच शैलीत लिहिण्याचा ते प्रयत्न करीत. रामायण-महाभारतातील खजिना अपार होता. त्यामुळे त्यातील माल घेऊन आपल्या कलाकुसरीने नटवून मांडण्याचा प्रयत्न होई. जुन्यांच्या अनुकरणावरच मुख्यतः भर असल्याने सवयीने वृत्तप्रमुख आले की कवि बनता येत असे. त्यामुळे स्वतःला "अभिनवकालिदास", "अभिनवभवभूति" "अभिनवजयदेव", "अभिनवपंडितराज", "अभिनवभर्तृहरि" अशा पदव्या घेण्यातच भूषण मानले जाऊ लागले. "अभिनवभारतचम्पू", "अभिनवहितोपदेशः", ह्यासारखी साहित्यकृतीची नावेही अशीच परपुष्टता व अनुकरणप्रियता दर्शवितात. रघुवंशाच्या धर्तीवर "भटवंश" हे पेशवेवंशावर काव्य लिहिले गेले. इतकेच नव्हे तर "जॉर्जवंशम्" ह्यासारखे परकीय सत्ताधिकाऱ्यांसंबंधी लिहिलेले काव्य कवींची प्रवृत्ती कशी होती ते चांगलेच प्रकट करू शकेल.

काव्यनिर्मिते हे बहुधा, ब्राह्मण, पुरुष, व फारसे मोठे पंडित नसणारे असे होते हे वर सांगितले. त्यांची बौद्धिक, आर्थिक, इत्यादि सर्वच कुवत अत्यंत मध्यम दर्जाची होती. सर्वच मुख्यतः कुटुंबवत्सल, अल्पसंतुष्ट असे होते. त्याचा दिवसातील बराचसा वेळ उपजीविकेचे साधन मिळवण्यात जाई. तसेच नित्यकर्मे, व्रतवैकल्ये करण्यात वेळ जाई. शिवाय श्रीमंत, सत्ताधीश लोकांची स्तुती हांजी हांजी, परनिंदा, आत्मस्तुती, टवाळकी ह्यातही बराच वेळ खर्च होई. अशा परिस्थितीत नवीन जीवनानुभव जागरूकतेने घेणे, त्यावर स्वतंत्र चिंतन करणे, नवी चाकोरी शोधणे, हे त्यांच्या हिशेबी येतच नव्हते. काही विद्वान्, शास्त्रीमंडळी अध्ययन, अध्यापन करीत; लेखन करीत, टीका, टिप्पणी लिहीत; पण काव्यनिर्मिति दुय्यम दर्जाचेच लोक करीत. त्यामुळे त्याच त्या जुन्या चंद्र, कमळ, सूर्य, हत्ती, हंस, सरोवर, सिंह, अष्टनायिका, धीरललित वगैरे नायक, राक्षस, नरक, अप्सरा, ऋषि ह्या घोटाळ्यात ते पडून राहत. स्वतःला प्रत्यक्षात न अनुभवण्यास मिळणारे जग ते जुन्या साचेबंद पद्धतीने व्यक्त करीत. एकूण ते जे साहित्य निर्माण करीत त्याला "मार्गी" असे म्हणता येईल.

ह्या काळात निर्माण झालेल्या काव्याचा एक मोठा भाग प्रासंगिक, किंवा नैमित्तिक साहित्याचा आहे. राज्यारोहण, पुण्यतिथ्या, जन्मोत्सव, लग्नमुंजी (मंगलाष्टके) ह्यासारखे प्रसंग म्हणजे काव्यनिर्मितीचे खास राखीव कुरण होते. (आणि आजही टिळक पुण्यतिथि, दिवाळी, शिवाजी-जयंती, नेहरू पुण्यतिथि इत्यादी सारखेच प्रसंग आणि चिनी आक्रमण ह्यासारखे नैमित्तिक विषयच संस्कृत साहित्याला लागतात.) अशा प्रसंगावर पाडलेल्या काव्यांना "निपात" काव्ये म्हणावे.








माणसाची सनातन सुख दुःखे, जीवनातील चकवेपणा कौटिल्य, ह्यांचे वर्णन अर्वाचीन संस्कृत कवितेत मुळीच आढळणार नाही. (आणि जवळ जवळ classical ह्या संज्ञेने बोधित होणाऱ्या सर्वच संस्कृत साहित्याचे ते एक वैशिष्ट्य आहे).

अर्वाचीन संस्कृत साहित्याचा दुसरा एक महत्वाचा विभाग हा "स्तोत्रे" ह्या प्रकारचा आहे. ऋग्वेदातील वरुणसूक्तात आढळणारी शरणागतीची भावना पुढे स्तोत्रकाव्यातील एक अत्यावश्यक गोष्ट झाली. आपण स्वतः फार मोठे पापी आहोत असे वाजवीपेक्षा अधिक तीव्रतेने सांगितले जाणे, परमेश्वराची खूप स्तुति, ती स्तुती जर कृष्ण-विष्णु ह्या देवतेला उद्देशून असेल तर त्या देवतेचे व्यभिचार वर्णन करणे इत्यादीही स्तोत्रवाङ्मयातील अविभाज्य लक्षणे ठरली. ऋग्वेदात सुरू झालेला Henotheism हा पुढे सर्वच वाङ्मयातून अनुवृत्त झालेला दिसतो. त्यामुळे ज्या देवतेची उपासना चालू असेल त्यावेळी ती देवता सर्वश्रेष्ठ मानावयाची आणि "त्वमेव प्रत्यक्षं ब्रह्मासि" ह्या थाटांची वाक्ये टाकावयाची ही पद्धती चांगलीच रूढ झाली. प्रत्येक देवाला मी तुझा मुलगा, तू माझी आई, वडील, इत्यादी नाती जोडली जाऊ लागली. हे सगळे अतिरिक्त प्रमाणात झाले हा विशेष.

ह्या कालखंडातील आणखी एक मोठा काव्यप्रकार म्हणजे राजस्तुति. संस्कृतकाव्ये म्हणजे भाटांचा उद्योग असेही एक समीकरण झाले. रघुवंशाच्या ५ व्या सर्गात कालिदासानेही एक 'भाटकाव्य' रचले आहे. पण पुढे त्याच धर्तीवर थोडा फार फरक करून भाटकाव्ये लिहिली गेली. Henotheism सारखा प्रकार राजस्तुतीतही दिसतो. अर्थातच अशी काव्ये करणारे कवि हे आश्रित व पोटार्थी असल्यामुळे ज्या राजांच्या पदरी ते असतील त्या राजांना सर्वश्रेष्ठ म्हणणे त्यांना भाग होते. मग स्वकीय राजे किंवा परकीय राजे, हाही भेद करण्याचे कारण नव्हते. ठराविक उपमा-उत्प्रेक्षांच्या व श्लेषांच्या आधारे त्यांनी त्या राजांची "दिगन्त" कीर्ति गायिली, त्यांचे स्त्रियांबरोबरचे विलास वर्णिले, त्यांना विजय, दीर्घायुष्य मिळावे म्हणून शुभेच्छा व्यक्त केल्या.

संकीर्णश्लोक, सुभाषिते, हाही एक काव्यप्रकार विपुलतेने अर्वाचीन कालात आढळतो. ह्या सुभाषितांचा विषय अर्थातच दुर्जननिंदा, सुजनस्तुति, याचक, दाता, कृपण, दारिद्र्य, संपत्ति, राजा, विद्या, प्रसिद्ध व्यक्ती ह्यासारखे ठराविकच असत. कोकिलान्योक्ति, मेघान्योक्ति सागरान्योक्ति इत्यादी काही ठळक अन्योक्तिप्रकारही वारंवार वापरले जात. हे काव्य मुख्यतः अर्थचमत्कृतिपूर्ण असे. जाता जाता अनुप्रासासारखा शब्दालंकार साधण्याकडेही लक्ष असे. श्लेष हा अलंकार तर ह्या श्लोकात सर्वव्यापी आहे. विठोबा अण्णा ह्यांचे संस्कृत श्लोक ह्या प्रकारचा एक नमुना म्हणून घेता येतील. प्रहेलिका, आणि तत्सदृश श्लोक (अशा श्लोकांना क्वचित् 'काव्यशास्त्रविनोद' असे नाव देण्यात येते.) ह्यांचाही ह्याच गटात समावेश करावा. देशी भाषांतील शब्द संस्कृत श्लोकात घालून कोडी तयार करणे किंवा विनोद करणे ही एक लकब होऊन बसली. ह्याच प्रकारात ग्राम्य कोट्या, अश्लीलत्व सूचक कोट्या ह्या स्वरूपाचे श्लोक येतील. हा शेवटचा प्रकार अगदीच हलक्या प्रतीचे लोक करीत. त्यांत वृत्तभंग, व्याकरणदोष इत्यादीही आढळतात.

एकंदरीत पाहता अर्वाचीन काव्यात समाधानकारक असा भाग आढळणे अतिशय कठीण आहे. वैदिक साहित्य, व्यास, वाल्मीकी– ह्यांची महाकाव्ये, कालिदास, शूद्रक, भर्तृहरी, इत्यादी थोर कवि ह्यांचा विसर पडला नव्हता, तरी ह्यांचे खरे गुण कशात आहेत ह्याची कुणी दखल घेत नव्हते. कालिदास, इत्यादी कवींवर स्तुतिपर असे श्लोक अंधपणे लिहिले गेले पण त्यांच्या साहित्याचे मर्म उपेक्षिले गेले. ह्याउलट त्यांच्या बाह्य वैशिष्ट्यांचे अंधानुकरण होत राहिले. शिवाय पुढे पुढे कवींचे आदर्श राहिले असे साहित्यिक म्हणजे माघ–भारवि, बाण, जयदेव, जगन्नाथ हे, ह्यातून काव्याचा कोंडमारा झाला हे स्वाभाविक होते.

## अप्पाशास्त्री राशिवडेकर : कर्तृत्व

ह्या अशा वातावरणातच अप्पाशास्त्री राशिवडेकर उदयास आले. ऐतिहासिक काटेकोर दृष्टीने ते संस्कृतमधील पहिले पत्रकार असे म्हणता येत नाही. तरी संस्कृतसाठी नव्या प्रेरणा घेऊन झटणारे ह्या दृष्टीने त्यांचे महत्त्व आहे. अप्पाशास्त्रींची निष्ठा, तळमळ, संस्कृतप्रीती आजवर सर्वच संस्कृतप्रचारकांना मार्गदर्शक झाली आहे. त्यांचे एक महत्त्वाचे वैशिष्ट्य








म्हणजे ते आपल्या भोवतालच्या परिस्थितीबद्दल खूप जागरूक होते. पत्रकाराला ते आवश्यकच असते. त्यांनी राजकारण, साहित्य, समाजकारण इत्यादि अनेक विषयावर गंभीर लेखन केले आहे, तसेच विपुल ललितलेखनही केले आहे. त्यांची स्वतःची मातृभाषा मराठी–तीत तत्कालीन नियतकालिकांचे जे गुणदोष, वैशिष्ट्ये होती, तीच त्यांच्या संस्कृत-चन्द्रिकेत दिसतात. संस्कृतभाषा मृत नाही, जिवंत आहे हे कृतीने सिद्ध करण्याचा एक प्रयत्न त्यांनी केला, त्यांना आर्थिक वगैरे अनेक अडचणींना तोंड द्यावे लागले. तरी त्यांचा उत्साह कमी झाला नाही.

अर्थातच अर्वाचीन काळांतील एक संस्कृतचे महत्त्वाचे पत्रकार व निष्ठावंत प्रचारक म्हणून अप्पाशास्त्रींची योग्यता थोर असली तरी एक साहित्यिक म्हणून त्यांना फारसे मोठे स्थान देता येणार नाही. एक तर जुनी, पारंपरिक विचारसरणी त्यांना सोडवली नाही. जुने आदर्श, जुन्या कवींचे अनुकरण ह्यापासून जरी त्यांनी स्वतंत्र काही गोष्टी केल्या असल्या तरी ते मुक्त नव्हते. नवी विचारसरणी की जी एतद्देशीय भाषांतील साहित्यात वेगाने प्रसार पावत होती आणि कमी-अधिक प्रमाणात एतद्देशीय भाषांच्या साहित्यात जागृति होत होती–ती विचारसरणी, बदलती मूल्ये, विज्ञान, यांत्रिक जगाची वैशिष्ट्ये इत्यादींशी त्यांचा पुरेसा परिचय नव्हता. शिवाय ते ज्या काळात होते, त्यावेळी भारतातील व बंगालच्या मानाने महाराष्ट्रातील साहित्यिक प्रगती बेताचीच होती. अप्पाशास्त्री आपल्या स्वभावधर्मानुसार पडलेल्या व परिस्थितिजन्य कुंपणाबाहेर पडू शकले नाहीत, किंबहुना तसे पडावे असेही त्यांना वाटले नसावे. तत्कालीन मराठी साहित्याचे जे मूल्यमापन आपण करू, तेच सामान्यतः अप्पाशास्त्रींच्या साहित्यांचे करावयास हरकत नाही. ह्या दृष्टीने त्यांची तुलना मराठीतील "केरळ कोकिळ"कार आठल्ये किंवा शि. म. परांजपे ह्यांच्याशी करता येईल. थोर संस्कृत साहित्यिक केवळ संस्कृतवरच नव्हे, तर प्रादेशिक भाषावरही चांगला-वाईट परिणाम घडवत आलेले आहेत. अप्पाशास्त्रींची थोरवी इतकी उच्च नाही.

अप्पाशास्त्रींचे महत्त्व कशात आहे ते आपण व्यवस्थितपणे समजून घेणे महत्त्वाचे आहे. पत्रकार ह्या दृष्टीने संस्कृतच्या पुढील पत्रकारांस ते मार्गदर्शक आहेत. अर्वाचीन संस्कृत साहित्यात राष्ट्रवादी रचना करणाऱ्यांमध्ये ते एक महत्त्वाचे आहेत. नवे शब्द, नव्या वाक्यरचना त्यांनी घडवल्या. प्रचलित जगातील घडामोडींबद्दल संस्कृतमध्ये परिणामकारक कसे लिहिता येईल ते दाखवले. त्या दृष्टीने संस्कृतच्या अभिव्यक्तीच्या कक्षा रुंदावल्या, दैनंदिन संभाषण संस्कृतमध्ये येईल अशा दृष्टीने प्रयत्न केले. त्यांच्या काळात ज्या प्रकारचे निबंध, कविता, कादंबरी, कथा इत्यादी साहित्यप्रकार मराठीत चालत तसेच ते संस्कृतात चालवून दाखविले. आपल्या नियतकालिकातून इतरांचेही लेखन प्रसिद्ध केले. संस्कृतच्या कार्याची एक दिशा दाखविली. हे इतरांना ठाऊक नव्हते असे नाही. इतर मंडळी प्रयत्नही करीत होतीच. त्या सर्वांचे अप्पाशास्त्री हे प्रतिनिधि मानता येतील. अप्पाशास्त्री हे संस्कृतचे प्रचारकही होते. संस्कृत भाषेबद्दल सर्वसामान्यपणे आदर असूनही प्रचार करावा लागावा हीच मुळी दुर्दैवाची पण एक सत्य घटना होती. कारण कालाच्या ओघात संस्कृत भाषा मृत झालेली होती. तिचे सामर्थ्य विसरले होते. अप्पाशास्त्रींनी लोकांचा संस्कृतशी संबंध आणला. विद्यार्थ्यांकरिता "चन्द्रिके"ची वर्गणी कमी ठेवली. श्रीमंत, संस्थानिक ह्याच्याकरता जास्त ठेवली, ह्या सारखा व्यावहारिक भागही लक्षात घेण्यासारखा आहे. जास्तीत जास्त लोकांना संस्कृतचा संबंध घडावा अशी इच्छा केली. स्वतः सतत अनेक प्रकारचे विपुल लेखन केले. आज ना उद्या कधी संस्कृतची चांगली प्रगति झाल्यावरही आपण त्यांचे स्मरण केले पाहिजे.

## अप्पाशास्त्रींच्या नंतर-आजपर्यंत

अप्पाशास्त्रींच्या नंतर झालेल्या साहित्याची वेगळी वैशिष्ट्ये दाखविण्याची व चर्चा करण्याची आवश्यकता नाही. कारण अप्पाशास्त्रींची वैशिष्ट्येच थोड्याफार प्रमाणात आज अनुवृत्त आहेत. तरीसुद्धा आजही असे लक्षात येते की "शास्त्रेषु हीनाः कवयो भवन्ति" हेच खरे आहे. ( अपवाद सापडतील. ) संस्कृतच्या क्षेत्रात पडणारी बुद्धिमान, व्यासंगी, दीर्घोद्योगी माणसे संशोधन, अध्ययन, अध्यापन इत्यादि करतात. प्रतिभावान् लोक आपापल्या भाषात साहित्यनिर्मिति करतात; कारण तेथे त्यांना अर्थ व यश ह्यांची प्राप्ति होते. संस्कृतमध्ये रचना करणे अद्यापिही विरळ आहे.








अजूनही काव्याचे विषय, काव्यनिर्मितीचे स्थलकाल इत्यादींमध्ये बदल नाही. सध्या संस्कृतसाहित्यात शिवाजी, राष्ट्रभक्ति, परकीय आक्रमण, पं. नेहरू, ह्यांची चलती आहे. स्वातंत्र्यदिनाच्या दिवशी कुटुंबवत्सल संस्कृत कवींच्या देशप्रेमाला ऊत येतो. सध्या समरगीतांचे पेव बरेच फुटले आहे. हिमालय, गंगा—यमुना, अशोक, चंद्रगुप्त, राणाप्रताप, शिवाजी, रक्त, ह्या शब्दांचे मिश्रण केले की समरगीत तयार होते. (प्रांतिक भाषात हेच चालू आहे.) ही काव्ये निर्माण करणारी संस्कृतची मंडळी युद्धावर गेलेली नाहीत, जाणार नाहीत युद्ध म्हणजे काय ह्याची कल्पनाही करू शकणे त्यांना अशक्य असते. अशा "अविचारित सुस्थ" अवस्थेत काव्यनिर्मिति मात्र चालू आहे. आणि अशा काव्यांच्या आधारे आपली प्रसिद्धी व संस्कृत भाषा जिवंत आहे असा जयघोष चालू असतो.

देवतास्तोत्रे, Henotheism इत्यादींचा अजून कंटाळा नाही. प्राचीन संस्कृतीचे अभ्यास न करता गोडवे गाणे, राम, कृष्ण हे फार थोर असे म्हणणे, (त्यांच्या खऱ्या मोठेपणाचा अभ्यास न करता), संस्कृत भाषा जगात श्रेष्ठ एवढेच म्हणणे, अलीकडील राजकीय स्थितीचा उपहास करणे इत्यादि विषय संस्कृतमध्ये नित्य आढळतात. अलीकडील काळात विदूषकगिरी करणे व विनोदी साहित्य लिहिणे ह्याकडेही बराच कल आहे. आपल्या स्वतःच्या भाषेतील किंवा इंग्लिशमधील शब्द घालून कोट्या करणे, इत्यादि प्रकार चालू आहेत. संस्कृतच्या प्रकृतीशी ते विसंगत आहे.

अलीकडील काळात संस्कृतच्या प्रगतीच्या दिशेने अजीबातच पावले पडत नाहीत असं नाही. संस्कृतात आज अनेक नियतकालिके चालू आहेत. ती आपापल्या परीने उत्साही, निष्ठावन्त, आणि प्रगतीला उत्सुक आहेत. मधून मधून काही लोक चांगले लेखन करीत असतात. त्याचे प्रमाण अल्प असले तरी संपूर्ण अभाव नाही. गेल्या काही वर्षात अनुवाद (संस्कृतमध्ये) करण्याचे कामही निःसंशय अभिनंदनीय रीतीने होत आहे. संस्कृतमध्ये नवीन, चांगले निर्माण होण्याआधी बाहेरच्या जगात काय चालले आहे ह्याची जाणीव अनुवादांमुळे येऊ शकेल. संस्कृतमध्ये जो एकसुरीपणा आला त्याचे कारण म्हणून इतर भाषांशी संबंध न येणे हे सांगितले जाते. आता हे कारण सांगण्याची सोय नाही. भारतीय भाषांतील साहित्य पाश्चात्य जीवनाचा व साहित्याचा संबंध आल्यामुळे शंभर वर्षात चारशे वर्षे पुढे गेले. संस्कृतबाबतही असे घडण्यास हरकत नव्हती आणि आजही नाही पण संस्कृतच्या लोकांनी आता अधिक परमतजिज्ञासु व परमतसहिष्णु बनले पाहिजे ही गोष्ट खरी. नवीनतेच्या दिशेने प्रयत्न करणारेही आज आहेत. त्याना यश येणे अशक्य नाही.

संस्कृतच्या अडचणी बऱ्याच आहेत. त्या सर्व ज्ञात असल्याने त्यांचा वेगळा विस्तार नको. आर्थिक अडचणी ह्या सर्वात प्रधान. त्या खालोखाल संस्कृतची उपेक्षा, अध्ययनात संस्कृतला कमी स्थान, इत्यादींचाही परिणाम होतो. संस्कृत म्हणजे प्रतिगामी विचारसरणी, धार्मिकता, ब्राह्मणप्राबल्य इत्यादी समजुती व्यापक प्रमाणात आहेत, त्यांचाही दुष्परिणाम संस्कृतच्या प्रगतीवर होतो. अडचणींबद्दल सर्वांनीच सहानुभूति बाळगली पाहिजे हेही खरे. आणि प्रतिकूल परिस्थितीतही जे संस्कृत प्रचार करीत आहेत, त्यांना श्रेय दिले पाहिजे. कालांतराने संस्कृतसाहित्य पुन जोमाने वाढेल अशी आशा आज करता येणे अशक्य नाही. संस्कृतच्या भूतकालाइतकाच भविष्यकाळही उज्ज्वल झाला तर तो स्वागतार्हच आहे.

[वरील लेखासाठी पुढील साहाय्याचा निर्देश करणे इष्ट वाटते :

(१) अर्वाचीन संस्कृत साहित्य— ले. वर्णेकर. ह्यांच्या एकूण भूमिकेशी वरील लेखातील भूमिका बऱ्याच ठिकाणी विरोधी आहे. तरी ह्या पुस्तकातील साधनसंकलनाचा उपयोग करून झाला (२) सुभाषितरत्नकोश— संपादक कोसंबी, गोखले. कोसंबींची प्रस्तावना. प्रस्तावनेतून काही विचार घेतले. (३) ह्याशिवाय इतर वाचनसाहित्य; तसेच गुरुवर्य डॉ. रा. ना. दांडेकर, प्रा. मंगरूळकर, प्रा. अर्जुनवाडकर ह्यांच्याशी चर्चा वगैरेच्या रूपाने किंवा अन्य मार्गाने मला त्यांचे साहाय्य झाले आहे. "शारदा" संस्कृत पाक्षिकाचे संपादक पं. गाडगीळ ह्यांनी अर्वाचीन साहित्यकृती मला वाचण्यास दिल्या, काही चर्चा केली. ह्या सर्वांबद्दल कृतज्ञता.]








प्रा. वि. म. वेडेकर

# डॉ. परशुराम लक्ष्मण वैद्य

## विविधतापूर्ण लेखनसंभार

**डॉ. परशुराम लक्ष्मण वैद्य** एम्. ए. डी. लिट्. (पॅरिस) हे पुणे येथील भांडारकर प्राच्यविद्या-मन्दिरातर्फे निघणाऱ्या महाभारताच्या संशोधित आवृत्तीचे प्रमुख संपादक म्हणून १९६१ पासून काम करीत आहेत. नुकत्याच गेल्या २९ जून १९६५ या तारखेस त्यांनी आपल्या वयाच्या ७५ व्या वर्षांत पदार्पण केले. आपल्या या वाढदिवसाच्या निमित्ताने डॉ. वैद्य यांनी आपले मित्र व विद्यार्थी यांच्या आग्रहा-वरून, त्यांचे आतापर्यंत जे लेख व ग्रंथ प्रकाशित झाले आहेत, त्यांची एक संदर्भसूचि तयार करून छापली व जिज्ञासूंना ती उपलब्ध करून दिली. ही संदर्भसूचि पहाता, डॉ. वैद्य यांनी प्राच्यविद्यासंशोधनाच्या क्षेत्रात जे भरघोस कार्य करून दाखविले आहे त्याची कल्पना येते व त्यांनी दीर्घकालपर्यंत चालविलेल्या विद्या-व्यासंगाचे सादर कौतुक वाटल्याशिवाय रहात नाही. त्यांच्या लेखनाच्या वर उल्लेखिलेल्या संदर्भसूचीत ८० वर नोंदी आहेत. या नोंदींतून लेखनाचे विषय व भाषा यांच्या दृष्टीने प्रकट होणारी विविधता डॉ. वैद्य यांच्या चतुरस्र बुद्धिमत्तेची व व्यासंगाची साक्ष देते. या नोंदीची फोड करावयाची झाल्यास ती अशी दिसते : ( १ ) संशोधनपूर्वक ज्यांचे संपादन केले आहे असे ४३ ग्रंथ आहेत. यात बौद्ध धर्म व तत्त्वज्ञान यांविषयी १७ संस्कृतमध्ये, २ पालीमध्ये व १ फ्रेंच-तिबेटीमध्ये असे एकंदर २० आहेत; जैन धर्म व तत्त्वज्ञान यासंबंधी ९ संस्कृतमध्ये, २ अर्धमागधीमध्ये व २ अपभ्रंश भाषेमध्ये असे एकंदर १३ आहेत; आणि महाभारत-रामायणपर्वें व इतर संस्कृत वाङ्मय या विषयीचे ग्रंथ १० आहेत. याशिवाय (२) वररुचि, हेमचंद्र, त्रिविक्रम यांची तीन व्याकरणे व अर्धमागधीचे व्याकरण यांवर असे ४ ग्रंथ आहेत. यांखेरीज ( ३ ) बौद्ध व जैन धर्म आणि तत्त्वज्ञान यावर २ स्वतंत्र ग्रंथ आहेत. याशिवाय ( ४ ) बौद्ध व जैन धर्म व तत्त्वज्ञान, अभिजात संस्कृत वाङ्मय, पालि, प्राकृत व अपभ्रंश भाषा, वैद्यक यांमधील नाना विषयांवर निरनिराळ्या नियतकालिकातून दिलेल्या लेखांची संख्या सुमारे ( संस्कृतातून १० + इंग्रजीतून ११ व मराठीतून ५ = ) २६ आहे. यांशिवाय वैद्यक-ग्रंथांची मराठीतून केलेली भाषांतरे व अष्टाङ्गहृदय, माधवनिदान व योगरत्नाकर इत्यादि ग्रंथांचे संपादन करून काढलेल्या आवृत्ती या वेगळ्याच.

## जुन्या व नव्या शिक्षणसंस्कारांचा समन्वय

डॉ. वैद्य यांनी आपला उपरिनिर्दिष्ट लेखनसंभार, आपल्या नित्याच्या प्राध्यापकीय व्यावसायिक जबाबदाऱ्या व कर्तव्ये पार पाडीत असतानाच आपल्या फुरसदीच्या वेळातून उभा केला आहे हे लक्षात ठेवले पाहिजे. त्यांनी अनेक शिक्षणसंस्थांतून एक घटक सदस्य म्हणून नित्याची कामे केली आहेत. प्राध्यापक म्हणून विद्यार्थ्यांना अध्यापन व मार्गदर्शन त्यांचे १९५८ पर्यंत चालू होते. अध्यापकीय व्यव-सायात पडण्यापूर्वी त्यांनी आपले अध्ययन व व्यासंग प्रतिकूल परिस्थितीशी झुंज देत कसा पार पाडला याचा इतिहास त्यांच्या निकटवर्तीयांना विदित आहे. ते १९०९ साली म्हणजे वयाच्या २१ व्या वर्षी मॅट्रिक परीक्षा उत्तीर्ण झाले. त्या आधी त्यांनी दोनच वर्षे इंग्रजी शिकण्यास सुरवात केली. वयाच्या १८ व्या वर्षापर्यंत त्यांचे संस्कृतमधून अध्ययन चालू होते. त्यांचे संस्कृत अध्ययन पंडिती पाठशालापद्धतीने झाले. कुलाबा जिल्ह्यातील सिद्धेश्वर या गावी त्यानी आरंभी संस्कृत व्याकरणाचे 'पांक्त' अध्ययन कोनकरशास्त्री यांच्या हाताखाली सुरू करून सांग-लीच्या पाठशाळेत ते पुढे चालू ठेवले. व्याकरणाबरोबर त्यांनी अभिजात संस्कृत वाङ्मय, दर्शने आणि आयु-र्वेदीय वैद्यक या विषयांतील ग्रंथांचे पद्धतशीर अध्य-यन करून त्या त्या शास्त्रांतील निरनिराळ्या परीक्षा



अनुक्रमणिका








दिल्या. वैद्यकग्रंथांचे अध्ययन त्यांनी नाशिकच्या देवधरशास्त्र्यांच्या मार्गदर्शनाखाली केले. या अध्ययनानंतर डॉ. वैद्य आपल्या नावाला अनुरूप असा वैद्यकीचाच व्यवसाय करणार होते. परंतु योगायोग निराळाच होता. या संस्कृत अध्ययनानंतर १९०९ साली म्हणजे वयाच्या १९ व्या वर्षी त्यानी रोहे येथे इंग्रजी शिकावयास सुरुवात केली. जुन्या पंडिती परंपरेप्रमाणे झालेल्या अध्ययनाने आलेली ग्रहणशक्तीची परिपक्वता व व्यासंगशीलता त्यांना पुढील शिक्षणात चांगलीच उपयोगी पडली. १९१२ साली ते मॅट्रिक परीक्षा उत्तीर्ण झाले; त्यात त्यांनी जगन्नाथ शंकरशेट शिष्यवृत्ति पटकावली. घरची गरीबी. बंधूंच्या शिक्षणाची जबाबदारी त्यांच्यावरच होती. कॉलेजशिक्षण त्यांना सलग घेता आले नाही. मध्येच त्यांनी पुणे येथे दीड वर्ष शिक्षकाची नोकरी केली व नंतरही काही थोडा वेळ शाळेत काम करून द्रव्यार्जन करीत त्यांनी आपला कॉलेजमधील अभ्यासक्रम पुरा केला. ते १९१८ साली बी. ए. प्रथम श्रेणीत उत्तीर्ण झाले व त्या परीक्षेत त्यांनी संस्कृतचे भाऊ दाजी प्राईझ मिळविले. पुढे एक वर्ष कोल्हापूरच्या राजाराम कॉलेजमध्ये काम करून, नंतर १९१९ साली सांगली येथे विलिंग्डन कॉलेजमध्ये ते प्राध्यापक म्हणून प्रविष्ट झाले. तेथेच काम करीत असताना त्यांनी १९२० साली पालि व महायान संस्कृत बौद्धवाङ्मय हा विषय घेऊन कलकत्ताविद्यापीठाची एम्. ए. परीक्षा दिली व तीत ते पहिल्या वर्गात उत्तीर्ण झाले. १९२१–२३ या काळात त्यांना भारतीय सरकारची शिष्यवृत्ति मिळून ते पॅरिस येथे गेले व तेथे त्यांनी १९२३ साली पॅरिस विद्यापीठाची डी. लिट् ही पदवी मिळविली. डी. लिट्. ला त्यांना मार्गदर्शक म्हणून आंतर–राष्ट्रीय कीर्तीचे फ्रेंच प्राच्यविद्यापंडित प्रा. सील्व्हाँ लेव्ही हे होते. 'आर्यदेवाची चतुःशती' या ग्रंथाची तिबेटी भाषेतून पुन्हा संस्कृतमध्ये पुनर्रचना करणे हा त्यांच्या डी. लिट्च्या प्रबंधाचा विषय होता. युरोपमधील वास्तव्यात त्यांना लाव्हले पूसें व याकोबी यासारख्या त्या वेळच्या प्रसिद्ध फ्रेंच व जर्मन प्राच्यविद्यापंडितांच्या निकट सांनिध्यात येण्याची संधी लाभली व त्यांना त्यांच्या अध्ययन-अध्यापनाची पद्धति जवळून पहावयास मिळाली. नंतर स्वदेशी परत आल्यावर त्यांनी १९३० पर्यंत सांगली येथील विलिंग्डन कॉलेज, १९३० ते ३२ पुणे येथील फर्ग्युसन कॉलेज, पुढे १९३२ ते १९४७ पुणे येथील वाडिआ कॉलेज या संस्थांतून संस्कृत व प्राकृत भाषा-वाङमयाचे प्राध्यापक म्हणून काम केले. वाडिआ कॉलेजमधून सेवानिवृत्त झाल्यावर त्यांची काशी येथील बनारस हिंदु विद्यापीठामध्ये 'मयूरभंज प्रोफेसर ऑफ संस्कृत अँन्ड पालि' म्हणून नेमणूक झाली. तेथे ते १९५२ पर्यंत ५ वर्षे होते. पुढे १९५४ ते १९५८ त्यांनी बिहारमधील दरभंग्याच्या 'मिथिला इन्स्टिट्यूट ऑफ रिसर्च इन संस्कृत' या संस्थेत संचालक म्हणून काम केले. त्यानंतर १९६१ पासून, आरंभी उल्लेखिल्याप्रमाणे, आज ते पुणे येथील भांडारकर प्राच्यविद्यामंदिर या संस्थेतर्फे संशोधनपूर्वक प्रकाशित होणाऱ्या महाभारताचे प्रमुख संपादक म्हणून काम करीत आहेत. अलीकडे काही वर्षांपासून, भारतसरकारने दरवर्षी स्वातंत्र्यदिनी अखिल भारतातील संस्कृत वाङमयाच्या व्यासंगी पंडितांना व विद्वानांना गौरवपूर्वक प्रशंसापत्र देऊन त्यांना मानचिन्ह म्हणून वार्षिक १५०० रु. देण्याची अभिनंदनीय प्रथा चालू केली आहे. डॉ. वैद्य यांचा संस्कृत व तत्संबद्ध भाषा या क्षेत्रातील अधिकार व कार्य बघून, त्यांना हे भारतसरकारचे मानचिन्ह १९६३ च्या ऑगस्टमध्ये देण्यात आले.

जुनी व आधुनिक शिक्षणपद्धति या दोन्ही पद्धतींच्या द्वारा शिक्षण झाल्यामुळे, डॉ. वैद्य यांच्या लेखनातून, भाषणातून व व्यक्तिमत्त्वातून जुन्या पण्डितपरंपरेप्रमाणे होणारे मूळ ग्रंथाचे सखोल मूलग्राही ज्ञान व त्याची उपस्थिती आणि आधुनिक शिक्षणाच्या अनुषंगाने येणारा व्यापक, चिकित्सक व ऐतिहासिक स्वतंत्र दृष्टिकोन या दोहोंचा मिलाफ झालेला दिसून येतो. याशिवाय जुन्या पण्डितपरंपरेप्रमाणे झालेल्या सखोल संस्कृत अध्ययनाचा त्यांना झालेला लाभ म्हणजे संस्कृत भाषेतून स्वतंत्र रचना करण्याइतके संस्कृतवरील प्रभुत्व हे होय. विद्यार्थिदशेमध्ये असतानाच त्या वेळच्या (१९०७–०९) 'सहृदया' या संस्कृत मासिकातून त्यांच्या







'संयोगितास्वयंवरः', 'परिहासाचार्यः' 'विजयिनी आख्यायिका' (शेक्सपिअरच्या 'रोमिओ ॲन्ड् जुलिएट' यांतील कथेचा अनुवाद) इत्यादि संस्कृत रचना प्रसिद्ध झाल्या. पुढे त्यांनी वेळोवेळी सभा-संमेलनातून जीं संस्कृत भाषणे केली तीही प्रसिद्ध झाली आहेत. त्याचे संस्कृतचे अध्ययन चालू असतानाच ते बंगाली भाषाही शिकले. बंगाली भाषेच्या साधारण संस्कृतप्रचुर ठेवणीमुळे त्या भाषेवर त्यांचा लोभ जडला असल्यास नवल नाही. बंगाली भाषेच्या त्या अध्ययनाच्या काळात त्यांच्या वाचनात हरप्रसादशास्त्री यांचे बंगाली पुस्तक 'वाल्मीकिर जय' हे वाचनात आले. त्या पुस्तकातील विश्वबंधुत्वपर विचारसरणीने त्या कुमार-वयात वैद्य इतके प्रभावित झाले की त्यांना त्या पुस्तकाचा संस्कृत अनुवाद करावासा वाटला. त्याप्रमाणे त्यानी १९०९ सालीच ग्रंथकर्त्याच्या संमतीने 'वाल्मीकिविजयः' या नावाने संस्कृत अनुवाद तयार करून ठेवला. तो संस्कृत अनुवाद त्यांच्याजवळ ५२–५३ वर्षे पडून होता. १९६१ साली पानशेत फुटल्यामुळे पुण्यावर ओढवलेल्या महापुराची झळ वैद्यांच्या घरापर्यंत येऊन पोहोचली. त्यांची पुष्कळ पुस्तके या पुराच्या पाण्यामुळे भिजून निरुपयोगी झाली. परंतु 'वाल्मीकिविजयः' हे हस्तलिखित सुदैवाने सुखरूप राहिले. ते जसेच्या तसेच अलाहाबाद येथे ग्रंथरूपाने १९६२ साली प्रसिद्ध झाले. 'वाल्मीकिविजया'ची डौलदार संस्कृत भाषाशैली, त्या कुमारवयात वैद्य अभिजात संस्कृत साहित्याच्या वातावरणात किती रंगून गेले होते याची साक्ष पटविते.

### महाभारत कार्यातील एक मोठे पर्व समाप्त

डॉ. वैद्य आज भांडारकर प्राच्यविद्यामन्दिरातर्फे प्रकाशित होणाऱ्या महाभारताचे प्रमुख संपादक म्हणून काम करीत आहेत याचा उल्लेख आरंभी आलाच आहे. यासंबंधी विशेष उल्लेख करण्यासारखी गोष्ट ही की, आज वैद्यांच्या अमदानीत महाभारताच्या कार्यातील एक मोठा टप्पा ४०-४५ वर्षानंतर नुकताच पूर्ण झाला आहे. महाभारताची संशोधित आवृत्ती काढण्याचा संकल्प ६ जुलै १९१८ ला भांडारकर प्राच्यविद्यामन्दिराच्या कार्यकारी मंडळाने केला. त्याच दिवशी औंधचे बाळासाहेब पंतप्रतिनिधि यांनी या कार्याकरता एक लाख रुपयाची देणगी जाहीर केली. पुढील एप्रिल १९१९ मध्ये डॉ. रामकृष्ण गोपाळ भांडारकर यांनी आपल्या शुभहस्ते 'नारायणं नमस्कृत्य' हा महाभारताच्या मंगलाचरणाचा श्लोक लिहून अनेक हस्तलिखितांवरून करावयाच्या पाठसंशोधनाच्या कार्याचा श्रीगणेशा केला. त्यानंतर डॉ. वि. स. सुकथनकर यांची १९२५ साली महाभारताचे प्रमुख संपादक म्हणून नियुक्ति झाली. सुकथनकरांनी आवृत्तिसंशोधन-शास्त्राच्या दृष्टीने महाभारताची शेकडो हस्तलिखिते व अनेक छापील आवृत्त्या यांच्या प्रचंड पसाऱ्याचे मंथन करून, नियोजित महाभारताची संशुद्ध आवृत्ति ज्या शास्त्रीय तत्त्वानुसार निघावी ती तत्त्वे पद्धतशीर बसविली व त्या तत्त्वानुसार महाभारताचे पहिले 'आदिपर्व' १९३३ साली प्रकाशित करून आपल्या संशोधित आवृत्तीमागील शास्त्रीय तत्त्वांस आंतरराष्ट्रीय मान्यता मिळविली. १९४३ साली डॉ. सुकथनकर यांच्या निधनानंतर डॉ. बेलवलकर हे प्रमुख संपादक झाले; ते प्रकृति–अस्वास्थ्यामुळे १९६१ साली निवृत्त झाले. त्यांच्याच जागी डॉ. वैद्य यांची नियुक्ति झाली. त्यावेळी महाभारताची एकंदर १८ पर्वांपैकी १७ पर्वे छापून झाली होती. एक पर्व डॉ. रा. ना. दांडेकर संपादीत असलेले 'अनुशासनपर्व' शिल्लक होते. त्यातील संशोधित पाठसंहिता, पाठभेद व परिशिष्टे यांसह ते अनुशासनपर्वही जुलै १९६५ अखेर छापून तयार झाले. यानंतर मूळ महाभारताचा भाग नसलेले पण परंपरेप्रमाणे 'महाभारताचा जोड–भाग म्हणून समजले गेलेले जे खिलपर्व 'हरिवंश' त्याची संशोधित आवृत्ति तयार करण्याचे काम चालू झाले असून, सबंध हरिवंशाचे संशोधन-संपादन डॉ. वैद्य यांच्याकडेच सोपविले गेले आहे. या 'हरिवंशा'च्या संशोधनप्रकाशनास मध्यवर्ती व महाराष्ट्र राज्यसरकारची मदत मिळत असून, या पर्वाचे काम पुरे व्हावयास अजून पाच वर्षांवर काळ लागेल असा अंदाज आहे. महाभारताचे हे राहिलेले 'खिल' पर्व सोडल्यास जुलै १९६५ अखेर १८ पर्वांच्या 'अ-खिल' महाभारताची संशोधित आवृत्ति तयार झाली असे एका अर्थी म्हणता येईल. यामुळे महाभारताच्या संशोधनाचा एक मोठा टप्पा किंवा मोठे पर्व संपले

आहे. या शुभ पर्वणीनिमित्त भांडारकर इन्स्टिट्यूटमध्ये डॉ. प. ल. वैद्यांनी २८ जुलै १९६५ या दिवशी भांडारकर-प्राच्य-विद्या-मंदिरातील सर्व कार्यकर्त्यांचे संमेलन स्वतः पुढाकार घेऊन घडवून आणले. त्या संमेलनप्रसंगी त्यांनी जे मोजके भाषण केले त्यात त्यांनी आपल्या प्रसंगोचित भावना बोलून दाखविल्या : "आजचा हा शुभ दिवस माझ्या अमदानीत येत आहे याची मला धन्यता वाटते. महाभारताची संशोधित आवृत्ति तयार करून ती छापून काढणे हे महाविकट नि किचकट काम. डॉ. सुकथनकर या कार्यात मध्येच कामास आले. डॉ. बलवलकर प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळे मध्येच निवृत्त झाले. महाभारताचे एक पर्व एकदाचे छापून बाहेर पडले म्हणजे त्या विशिष्ट संपादकाला व प्रमुख संपादकाला किती हायसे वाटते याची मला कल्पना आहे. डॉ. सुकथनकर तर एक पर्व प्रकाशित झाले की, असाच एक छोटा स्नेह-संमेलन-समारंभ घडवून आणीत असत, आणि एका जबाबदारीतून मुक्त झाल्याचा सुटकेचा निश्वास टाकून पुन्हा पुढच्या कामाला लागत, हे मी प्रत्यक्ष पाहिले आहे. आज तर महाभारताची सर्व १८ पर्वे छापून पूर्ण झाल्याचा सुयोग आला आहे. म्हणून माझ्याप्रमाणेच आपणा सर्वांना– महाभारताचे गठ्ठे घेऊन जाणारा शिपाई, छापणारा मुद्रक यांपासून तो संपादकांपर्यंत सर्वांना– धन्यता वाटण्याचा हा दिवस आहे."

डॉ. वैद्य यांच्या वरील भाषणात महाभारताच्या कार्याविषयी जी आत्मीयता दिसून येते, ती स्वाभाविकच आहे. कारण त्यांचा महाभारताच्या कार्याशी आरंभापासूनच अत्यंत निकट असा संबंध आला आहे. डॉ. सुकथनकरांनीच त्यांना आरंभीच एकदा "भांडारकर संस्थेच्या महाभारतविषयक संपादन-संशोधन करणाऱ्या कार्यकर्त्यात कायमचेच सामील व्हा व विराटपर्वाच्या संशोधन-संपादनाला सुरुवात करा" असे आवर्जून म्हटले होते. परंतु वैद्य खासगी अडचणींमुळे ते मान्य करू शकले नाहीत. पुढे १९३१ साली बेल्जममध्ये लायडन येथे आंतरराष्ट्रीय प्राच्यविद्यापरिषद् भरली तिला डॉ. सुकथनकरांबरोबर डॉ. वैद्यही प्रतिनिधी म्हणून हजर राहिले होते. त्या निमित्ताने तीन महिने एकत्र केलेल्या प्रवासात महाभारताच्या पुढील योजनांविषयी डॉ. सुकथनकरांनी व वैद्यांनी बराच विचारविनिमय करून काही बेत आखले. डॉ. सुकथनकरांचा असा एक विचार होता की, महाभारतातील निरनिराळ्या पर्वांच्या संपादनात युरोपमधील प्रसिद्ध प्राच्यविद्यापंडितांचे सहकार्य घ्यावे. सुप्रसिद्ध प्राच्यविद्यापंडित डॉ. विंटरनिट्झ यांना 'सभापर्वाचे संपादनकार्य हाती घ्यावे' अशी विनंति करावयाला डॉ. सुकथनकर व वैद्य असे दोघेही प्राग येथे गेले होते. तसेच बर्लिन येथील डॉ. ल्युडर्स यांनी कर्णपर्वाचे संपादन करावे असेही त्यांनी योजिले होते. पण दोन्हीही योजना फलद्रूप होऊ शकल्या नाहीत. डॉ. सुकथनकरही महाभारताच्या वाढत्या कामाच्या व्यापात अधिकाधिक व्यग्र झाले. डॉ. विंटरनिट्झ व ल्यूडर्स पुढे निधन पावले. सभापर्वाचे संपादन अमेरिकेतील डॉ. एडगरटन यांच्याकडे सोपविण्यात आले. डॉ. सुकथनकर १९४३ साली निधन पावले. नंतरचे प्रमुख संपादक डॉ. बेलवलकर यांनी कर्णपर्वाचे संशोधन-संपादन डॉ. वैद्य यांच्याकडे सोपविले. डॉ. वैद्यांचे संशोधित-संपादित कर्णपर्व १९५४ साली बाहेर पडले.

### संहिता-संशोधन-शास्त्रात हातखंडा

डॉ. वैद्य यांनी आता हरिवंशाचे संशोधनपूर्वक संपादन करावयाचे काम हाती घेतले आहे याचा उल्लेख वर आलाच आहे. एखाद्या प्राचीन ग्रंथाचे, त्याची सर्व उपलब्ध हस्तलिखिते, तत्संबद्ध सर्व छापील आवृत्त्या, त्यावरील उपलब्ध टीका व इतर पुरावे यांची संशोधनपूर्वक छाननी करून, संपादन करणे, त्या ग्रंथाची मूळ संशुद्ध आवृत्ति तयार करणे– हे एक युरोपमध्ये आधुनिक काळी स्वतंत्र तंत्र किंवा ज्याला मूल-पाठ-संहिता-संशोधन-शास्त्र म्हणता येईल असे एक शास्त्रच बनले आहे. त्यात पुन्हा महाभारतासारख्या अतिप्राचीन व विराट् स्वरूपाच्या अनन्यसामान्य ग्रंथाच्या बाबतीत तर या तंत्राचा किंवा शास्त्राचा वापर करणे अत्यंत जिकीरीचे असून, त्यामुळे महाभारताच्या संशोधक-संपादकावर अनन्यसाधारण अशी जबाबदारी येऊन पडते. ही जबाबदारी योग्यपणे पार पाडण्याकरिता, त्या



अनुक्रमणिका








संपादकाच्या अंगी आधुनिक पाठ–संहिता–संशोधन–शास्त्राच्या सखोल ज्ञानाबरोबरच, प्राच्यविद्याक्षेत्रातील विविध शाखांचा सखोल व्यासंग, निरनिराळ्या जुन्या ग्रंथांच्या संपादनाचा अनुभव, विलक्षण वारकावा, उदंड परिश्रमशीलता आणि सूक्ष्म, परिपक्व बुद्धि इत्यादि गुण असावे लागतात.

डॉ. वैद्य यांच्या ठिकाणी हे गुण भरपूर प्रमाणात आहेत हे त्यांनी केलेल्या ज्ञानसाधनेचे व त्यांच्या प्रकाशित वाङमयाचे जे वर आकडेवार ओझरते दर्शन करून दिले आहे त्यावरून स्पष्ट होईल. त्यांनी संशोधनपूर्वक संपादन इतक्या ग्रंथांचे केले आहे की, त्यांचा या शास्त्रात हातखंडा असून त्यांचे या क्षेत्रातील स्थान अग्रगण्य आहे असे म्हणता येईल. वर त्यांच्या वाङमयाच्या सूचीत ज्यांचा केवळ उल्लेख आला आहे, त्यापैकी काही संपादित ग्रंथांचा प्रस्तुत संदर्भात नावनिशीवार थोडा अधिक तपशील देणे उचित होईल. त्यांनी संपादन केलेल्या महाभारतातील कर्णपर्वाचा उल्लेख वर आलाच आहे. बडोदे विद्यापीठाने रामायणाची संशोधित आवृत्ति प्रकाशित करण्याचे काम हाती घेतलेले आहे. त्यात डॉ. वैद्यांनी संपादिलेले अयोध्याकांड तीन वर्षांपूर्वी बाहेर पडले व त्यांनीच संपादून दिलेले 'युद्धकांड' प्रकाशनाच्या मार्गावर आहे. –पुष्पदंत नावाचा दिगंबरपंथाचा एक जैन महाकवि इ. स. च्या १० व्या शतकात मराठवाड्यातील मान्यखेट (मानखेड) या गावी होऊन गेला. त्याचे दोन उत्कृष्ट काव्यग्रंथ 'यशोधरचरित' आणि 'महापुराण' हे अपभ्रंश भाषेतील प्राचीन ग्रंथ समजले जातात. या दोन्हीही ग्रंथांच्या संशोधित आवृत्ती डॉ. वैद्यांनी संपादित केल्या आहेत. या ग्रंथांपैकी 'महापुराण' हा ग्रंथ मोठा असून त्याचे तीन खंड– एकंदर सुमारे दीडहजार डेमि साइझ पानापेक्षा अधिक–१९३७ ते १९४१साली त्यांच्या संपादकत्वाखाली प्रसिद्ध झाले. त्या आधी या 'महापुराणा'ची संशोधित आवृत्ति तयार करण्याचे त्यांचे काम दहा वर्षे चालू होते:– १९५६ साली भगवान् बुद्धाच्या २५०० व्या परिनिर्वाणतिथीच्या निमित्ताने भारत-सरकारने 'बौद्धसंस्कृतग्रन्थावली' प्रसिद्ध करावयाचे ठरविले. त्या ग्रंथावलीतील सर्व ग्रंथांच्या संशोधनपूर्वक संपादनाची व मुद्रण-प्रकाशनाची जबाबदारी भारतसरकारने डॉ. वैद्य यांच्यावर सोपविली. या ग्रंथावलीत नियोजित ग्रंथ २५ आहेत. त्यापैकी आतापर्यंत १७ ग्रंथ संशोधित आवृत्तींच्या स्वरूपात छापून बाहेर पडले आहेत. उपरिनिर्दिष्ट सर्व संपादिलेल्या ग्रंथांना डॉ. वैद्य यांनी आवश्यक अशा महत्त्वाच्या प्रस्तावना वा उपोद्घात लिहिले आहेत. त्या प्रस्तावनातून त्या त्या ग्रंथाच्या संशोधित आवृत्तीला आधारभूत झालेले हस्तलिखित, मुद्रित वा इतर साहित्य, त्या ग्रंथाचा व ग्रंथकाराचा कालनिर्णय, आणि, त्याच्या अंतरंगाची ओळख इत्यादि जिज्ञासू वाचकांच्या दृष्टीने आवश्यक असलेल्या गोष्टींचे मौलिक व मोलाचे विवेचन आले आहे. बौद्ध संस्कृत ग्रन्थावलीतील काही महायान संस्कृत ग्रन्थ, उदाहरणार्थ-महायानसूत्रसंग्रह खंड (१) व (२), हे प्रथमच देवनागरीमध्ये मुद्रित होऊन वाचकापुढे येत आहेत. या बौद्ध संस्कृत ग्रन्थावलींतील प्रत्येक ग्रंथाची संहिता, ही त्या ग्रंथाच्या आतापर्यंत प्रसिद्ध झालेल्या आवृत्त्या, त्याची अद्ययावत् सापडलेली हस्तलिखिते, चिनी-तिबेटीवरून समजून येणारे त्यातील पाठभेद इत्यादि सर्व गोष्टी विचारात घेऊन निश्चित केली गेली आहे. उदाहरणार्थ, या ग्रंथावलीतील ६ व्या क्रमांकाने प्रसिद्ध झालेला 'गण्डव्यूहसूत्रम्' नावाचा ग्रंथ; या ग्रंथाचे हस्तलिखित बडोद्याच्या ओरिएंटल इन्स्टिट्यूटच्या मॅन्युस्क्रिप्ट लायब्ररीत उपलब्ध झाले. त्याचा आतापर्यंत उपयोग होऊ शकला नव्हता. त्या हस्तलिखिताचा उपयोग डॉ. वैद्य यांनी आपल्या ग्रंथाकरिता प्रथमच करून घेतला आहे. त्यामुळे त्यांच्या या ग्रंथाला वैशिष्ट्य प्राप्त झाले आहे. बौद्धसंस्कृतग्रंथावलीमुळे महायान बौद्ध धर्म व तत्त्वज्ञान याचे मुळातून ज्ञान करून घेऊ इच्छिणाऱ्या अभ्यासूला एक मोलाचा साधनसंग्रह उपलब्ध करून दिला गेला आहे.

डॉ. वैद्यांनी संपादित केलेल्या सर्वच मौलिक ग्रंथाविषयी एक गोष्ट नजरेत भरल्याशिवाय रहात नाही. ती गोष्ट म्हणजे या ग्रंथाचे उठावदार व मोहरेदार स्वरूप. या सर्वच ग्रंथांच्या शास्त्रशुद्ध अंतरंगाबरोबर, त्याचे बहिरंगही अत्यंत सुंदर आहे; मुद्रण स्वच्छ व शुद्ध असून, मजकुराची मांडणी मोकळी, आकर्षक व विचारपूर्वक केलेली आहे. 'यशोधरचरित' आणि 'महापुराण' या ग्रंथातून








अपभ्रंशातील काव्यपंक्तींची अशी मांडणी करून छापली आहे की दोन पंक्तींच्या शेवटी जुळणारी यमके वाचकांच्या एकदम लक्षात यावी. अशी मांडणी पूर्वीच्या आवृत्तीतून कोणीही केली नव्हती. सुप्रसिद्ध जर्मन प्राच्यविद्यापण्डित याकोबी याने वैद्यांच्या आवृत्तीतील या वैशिष्टचांची मुक्तकंठाने प्रशंसा केली, असे म्हणतात.

## संस्कृत व प्राकृत भाषा यांचा चतुरस्र व्यासंग

डॉ. वैद्य यांच्या ज्ञानसाधनेचा महत्वपूर्ण विशेष असा की, ती बहुविध व चतुरस्र आहे. त्यांचा व्यासंग संस्कृतपुरताच मर्यादित नाही. पालि, प्राकृत, अर्धमागधी, अपभ्रंश या भाषांचा व त्यातील वाङमयाचा त्यांनी कसून अभ्यास केला आहे. १९२५ साली त्यांची मुंबई विद्यापीठाचे 'स्प्रिंगर रिसर्च स्कॉलर' म्हणून नियुक्ति झाली. ते काम करताना त्यांनी प्राकृत व अपभ्रंश भाषांचा विशेष अभ्यास केला. त्रिविक्रम, वररुचि, व हेमचंद्र यांच्या प्राकृत व्याकरणांच्या आवृत्ती त्यानी संपादन करून प्रसिद्ध केल्या आहेत व अर्धमागधीच्या व्याकरणावरही त्यांनी एक पुस्तक लिहिले आहे. वर पुष्पदंत नावाच्या जैन कवीच्या अपभ्रंश-भाषेतील महाकाव्यांच्या त्यांनी संपादित केलेल्या आवृत्तींचा उल्लेख आलाच आहे. या प्राकृत व अपभ्रंश भाषांच्या अभ्यासाचे आकर्षण त्यांना विशेष वाटले याचे कारण त्यांनी 'यशोधरचरित' या काव्याच्या आवृत्तीच्या इंग्रजी प्रस्तावनेत दिले आहे, ते असे : "पुष्पदंत या कवीने इ. स. च्या १० व्या शतकात सध्याच्या मराठवाड्यांतील पूर्वीची राष्ट्रकूटांची राजधानी मान्यखेट या गावी हे काव्य अपभ्रंश– भाषेत लिहिले. या गावाच्या आसमंतात् असलेल्या सुमारे शंभर मैलांच्या परिसरात, सुमारे त्याच काळात आरंभीच्या जुन्या सुप्रसिद्ध मराठी काव्यगद्यवाङमयाची निर्मिति झाली. त्या जुन्या मराठी भाषेच्या रचनेवर अपभ्रंश भाषेचा परिणाम होणे अपरिहार्य होते. तो परिणाम शोधून काढता आल्यास बघावा या दृष्टीने अपभ्रंश भाषेचा अभ्यास मला विशेष आकर्षक व उद्‌बोधक वाटला." त्यामुळेच डॉ. वैद्य या भाषांच्या व्यासंगास व तुलनात्मक अभ्यासास प्रवृत्त झाले. पुढे मुंबई विद्यापीठातर्फे होणाऱ्या 'विल्सन फायलालॉजिकल लेक्चर्स' या मालेत त्यांनी व्याख्यान दिली. ती अजून अप्रकाशित आहेत. या त्यांच्या विविध भाषाविषयक व्यासंगामुळे ते 'लिंग्विस्टिक सोसायटी ऑफ इंडिआ' या भाषासंशोधन-संस्थेचे एक वर्ष अध्यक्ष होते.

## बौद्ध व जैन धर्म आणि तत्त्वज्ञान यांचे मौलिक परिशीलन

संस्कृत व तत्संबद्ध भाषा व त्यांतील वाङमय यांच्या विशेष व्यासंगामुळे डॉ. वैद्य यांच्या विद्वत्तेला बहुविधता व सव्यसाचित्व प्राप्त झाले आहे. हिंदु धर्म व तत्त्वज्ञान यांबरोबरच त्यांचा बौद्ध व जैन धर्म आणि तत्त्वज्ञान यांचा मुळातून अभ्यास झाला आहे. १९२७ साली त्यांचे 'बोद्ध धर्माचा अभ्युदय आणि प्रसार' हे पुस्तक प्रसिद्ध झाले. या पुस्तकात बौद्धधर्माची तत्त्वे व बौद्ध तत्त्वज्ञान यांचे मूलग्राही संक्षिप्त विवेचन आले आहे. या विषयावरील मौलिक अशा मराठी पुस्तकात आजही ते एक अग्रगण्य समजले जाईल इतके मोलाचे आहे. याशिवाय बौद्ध धर्म व तत्त्वज्ञान यांच्यावरील वाङमयाच्या त्यांच्या अभ्यासाचे एक परिपक्व फल म्हणून त्यांच्या १९५६ साली प्रसिद्ध झालेल्या 'बौद्धागमार्थसंग्रहः' या ग्रंथाचा विशेष उल्लेख केला पाहिजे. या ग्रंथात बौद्धांच्या मूळ पालि व संस्कृत ग्रंथातील अत्यंत महत्त्वाचे असे सुमारे दोनशे उतारे दिले असून त्यांची बुद्धचरित, बौद्धधर्म व तत्त्वज्ञान, भिक्षु-भिक्षुणींचा आचारधर्म, बुद्धवचनसंग्रहाच्या निरनिराळ्या काळी झालेल्या आवृत्ती इत्यादि निरनिराळ्या सदरांखाली इतिहासदृष्ट्या विषयवार मांडणी केली आहे. बौद्धधर्म व तत्त्वज्ञान यांचे ज्याला मुळातून सार चाखायचे असेल त्याला हा संक्षिप्त साधनसंग्रहरूप ग्रंथ अत्यंत आवश्यक व मोलाचा झाला आहे. वाई येथील प्राज्ञपाठशाळामंडळाने या ग्रंथाचा मराठी अनुवाद प्रकाशित करावयाचे ठरविले आहे.

बौद्ध धर्म व तत्त्वज्ञान याप्रमाणेच जैन धर्म व तत्त्वज्ञान यांच्या बाबतीतही असाच मौलिक आगमार्थसंग्रह प्रसिद्ध करण्याइतकी साधनसामग्री डॉ. वैद्य यांच्याजवळ तयार आहे. नागपूर विद्यापीठाने








१९४४ साली त्यांचे "जैन धर्म व वाङमय" हे विद्यापीठातर्फे दिलेल्या व्याख्यानांचे पुस्तक प्रसिद्ध केले. या पुस्तकात जैन धर्म व तत्त्वज्ञान याविषयी मूलग्राही विवेचन आले आहे. या पुस्तकातील शेवटच्या व्याख्यानात डॉ. वैद्य यांनी प्राचीन मराठी वाङमयात 'ढवळें' हा जो वाङमयप्रकार दिसून येतो, त्याची उत्पत्तिमीमांसा केली आहे. काही मराठी संशोधकांनी 'ढवळे' या गीतप्रकाराची व्युत्पत्ति 'धव+ल' अशी लावली असून त्याचा अर्थ लग्नात गावयाचे वरविषयक गीत असा केला आहे. हा अर्थ कसा चुकीचा आहे हे डॉ. वैद्य यांनीं दाखवून दिले आहे. अपभ्रंश-वाङमयात 'धवल' नावाचे लोकगीत वृत्त असून त्या वृत्तात अपभ्रंश भाषेत बरीच काव्यरचना आहे. प्राचीन मराठी वाङमयावर अपभ्रंशवाङमयाचा परिणाम म्हणून 'ढवळे' हा वृत्तप्रकार रूढ झाला असावा, असे वैद्यांनीं साधार दाखविले आहे. जैन धर्मग्रंथाच्या त्यांच्या मौलिक व्यासंगामुळे, त्यांच्या जैनधर्मविषयक ज्ञानाला जैन समाजातही एक विशेष अधिकार व वजन प्राप्त झाले आहे. याविषयी त्यानीच एकदा बोलण्याच्या ओघात एका प्रसंगाची गोष्ट सांगितली तिचा उल्लेख करणे उचित होईल. एका मोठ्या शहरी जैनांचे पर्युषणपर्व चालू होते. त्यानिमित्त जैनधर्म व तत्त्वज्ञान यावर तेथील जैन कार्यकर्त्यांनी व्याख्यानमाला योजिली होती. डॉ. वैद्य यांना एका दिवशी व्याख्यान द्यायला त्या कार्यकर्त्यांनी बोलाविले. डॉ. वैद्य जैन मन्दिरात त्याप्रमाणे उपस्थित झाले. मन्दिर श्रोत्यांनी अगदी भरून गेले होते. वैद्य व्याख्यान द्यायला सुरुवात करणार इतक्यात श्रोतृसमाजातील एकजण उठून विचारू लागला : "व्याख्यात्यांना जैन धर्मावर बोलायचा काय अधिकार आहे ? या जैनेतर मनुष्यास येथे व्याख्यानास कशाकरितां बोलाविले आहे ?" भर सभेत ऐनवेळी अशा उद्‌गारांचा स्फोट ऐकून तेथील जाणते लोक व कार्यकर्ते क्षणभर या अनुचित प्रकाराने स्तंभित झाले. डॉ. वैद्य बोलायला उभे राहिलेच होते. त्यांनी खाली न बसता समयसूचकपणे त्या उद्‌गारांचा उपयोग आपल्या भाषणात करून घेतला. ते म्हणाले : " मी जैन नाही. तसा मला आपल्या समाजापुढे येऊन व्याख्यान द्यायचा अधिकारही नाही हे खरे. पण मी जैन वाङ्मयाचा एक अभ्यासक आहे. माझा असा नम्र दावा आहे की, जैन धर्म-व-तत्त्वज्ञान-वाङ्मयाचा मी जितका अभ्यास केला आहे व ते वाङ्मय प्रसिद्ध करून जैन धर्म व तत्त्वज्ञान यांचे यथार्थ ज्ञान समाजाला व्हावे याकरिता मी जेवढा प्रयत्न केला आहे तितका अभ्यास व प्रयत्न खुद्द जैन–धर्मीयांपैकी फारच थोड्यांनी केला असेल." असे म्हणून वैद्य यांनी जैन वाङमयातील आपण जे ग्रंथ संशोधनपूर्वक अभ्यासिले व प्रसिद्ध केले त्यांची व त्यातील माहिती सांगितली. सभा मुग्ध होऊन त्यांचे व्याख्यान ऐकत होती. व्याख्यान संपल्यावर समारोप करताना तेथील मुख्य कार्यकर्त्यांपैकी एक, जे स्वतः जैन असून जैन वाङमयाचे मोठे अभ्यासु पंडित होते, ते म्हणाले, "आरंभी एका श्रोत्याने विचारलेल्या शंकेला वैद्यांचे आपण शांतपणे ऐकून घेतलेले व्याख्यानच समर्पक उत्तर आहे. जैन वाङमयाचा मुळातून अभ्यास करणारा एक जैन म्हणून मी असे जाहीरपणे सांगू इच्छितो की, वैद्य यांनी आपल्यावर मोठे ऋण करून ठेविले आहे. जे जैन ग्रंथ आम्हास पूर्वी दुर्बोध वाटत होते, तेच वैद्य यांनी संशोधनपूर्वक प्रकाशित करून आमच्यापुढे ठेवल्यानंतर आम्हाला अत्यंत अर्थपूर्ण वाटू लागले आहेत." तसेच एकदा १९४२ च्या सुमारास, श्वेतांबरपंथीयांच्या आचार्यात संवत्सरीच्या निमित्ताने तिथिवृद्धिक्षय याबाबत मोठे तीव्र मतभेद होऊन मोठा वाद माजला होता. त्या वादांतील मुद्द्यांची छाननी करून त्याबाबत खरे वस्तुस्थितिनिदर्शक असे आपले अधिकृत मत प्रकट करावयास अहमदाबादचे प्रसिद्ध विद्याप्रेमी कस्तूरभाई लालभाई यांनी जैन आचार्यांच्या संमतीने, डॉ. वैद्य यांना विनंति केली. त्याप्रमाणे डॉ. वैद्य हे पालीटाण्यास गेले व तेथे त्यांनी मूळ जैन ग्रंथाधारे या वादातील मुद्द्यांचा अभ्यास केला. अभ्यासाअंती त्यांना या वादाबाबत जे वाटले ते त्यांनी संस्कृतमध्ये लिहून दिले. ते 'मध्यस्थस्य निर्णयपत्रम्' या नावाने (१९४३ साली) प्रसिद्ध झाले. हे निर्णयपत्र १६ फुलस्केप पानी असून संस्कृत शास्त्रीय वाङमयाच्या झोकदार अशा न्यायघटित भाषेत लिहिलेले आहे. ते श्वेतांबरपंथीयांच्या दप्तरी महत्त्वाच्या कागदपत्रात समाविष्ट झाले आहे.

## बुद्धिनिष्ठ, मानवतावादी व्यक्तिमत्त्व

वैद्य एवढे प्रकांडपंडित. पण त्यांच्या सांनिध्यात येणाऱ्या माणसावर त्यांचा साधेपणा व सरळ व्यक्तिमत्त्व यांचा प्रभाव पडल्याशिवाय रहात नाही. त्यांना आपल्या विद्वत्तेचे ओझे नाही व दुसऱ्यालाही ते वाटू देत नाहीत, इतकी त्यांची वागणूक अकृत्रिम व मोकळी वाटते. त्यांच्या ठिकाणी विद्वत्तेचा, प्रतिष्ठेचा वा अधिकारपदाचा दिमाख वा दुरभिमान दिसून येत नाही. त्यांच्याशी साध्याही कामानिमित्ताने संबंध आलेल्या व्यक्तीला, त्यांच्या वागणुकीतील चोखपणा, कामातील काटेकोरपणा, त्याचबरोबर त्यांच्या वृत्तीतील सहानुभूति व औदार्य प्रतीत झाल्याशिवाय रहात नाही.

डॉ. वैद्य यांची जीवनदृष्टि बुद्धिनिष्ठ मानवतावादी असावी असे त्यांच्या निकट सांनिध्यात आल्यानंतर वाटल्याशिवाय रहात नाही. लहानपणी त्यांचे जुन्या परंपरेने शिक्षण झाले व तद्द्वारा भारतीय प्राचीन संस्कृतीचे संस्कार त्यांच्यावर मूळ वाङमयातून प्रत्यक्षतया झाले. पण साधारणतः जुन्या शास्त्रीमंडळींच्या ठिकाणी प्राचीन संस्कृतीतील सर्वच गोष्टींवर जो अंध विश्वास दिसून येतो तसा डॉ. वैद्य यांच्या ठिकाणी दिसून येत नाही. प्राचीन संस्कृतीतील मानव्याला उचित असे विचार प्रमाण मानून आधुनिक काळाला गैरलागू असलेले आचारविचार त्याज्य मानण्याकडे त्यांचा कल आहे. जुन्या कर्मकांडावर त्यांचा विश्वास नाही. ईश्वरसाक्षात्कार, आध्यात्मिक गूढगुंजन याबद्दल त्यांना रुचि नाही. साक्षात्कार, गुरुसंप्रदाय, अतीन्द्रिय ज्ञान, अलौकिक ईश्वरी सामर्थ्य, परलोक इत्यादि अ-बुद्धिगम्य विषयांविषयी गोष्टी निघाल्या असता ते सरळ सांगतात की "आपणास यातील काही गम्य नाही." बुद्धाविषयी असे म्हणतात की, त्याला आत्मा, परलोक, इत्यादि अतीन्द्रिय अनुभवाविषयी विचारले असता, तो ते प्रश्न टाळीत असे वा मौन पाळीत असे. बुद्धाचा मुख्य भर ऐहिक दुःखपरिहारावर व तो परिहार करण्याकरता आवश्यक असे जे मानवी गुण प्रज्ञा व करुणा यांवर होता. बौद्ध वाङ्मयाचे निष्ठावंत अभ्यासक डॉ. वैद्य यांचीही जीवनदृष्टी तशीच असावी असे वाटते. परंतु जुन्या परंपरागत अध्यात्मासंबंधी रुचि नसली, तरी प्राचीन संस्कृतीला व आधुनिकच काय कोणत्याही काळच्या संस्कृतीला मान्य होणारा सदाचार व त्यामागील मानवी प्रेरणा यावर त्यांची अढळ श्रद्धा आहे. त्यांचे सर्वच जीवन या त्यांच्या अढळ श्रद्धेचा मूर्तिमंत आदर्श आहे. मानवी प्रेरणांपैकी एक सर्वोच्च मूल्याची जी ज्ञानसाधनेची प्रेरणा तिचे त्यांनी अखंड व्रत चालविले असून कित्येकांना प्रेरणा दिली आहे. ज्ञानसाधनेला वाहून घेणाऱ्या कित्येक विद्वानांच्या ठिकाणी जी समाजविमुखता दिसून येते ती डॉ. वैद्यांच्या ठिकाणी नाही. त्यांनी कित्येक व्यक्तींना व संस्थांना उत्स्फूर्तपणे सढळ हाताने हजारो रुपयांची मदत केली आहे.

## ज्ञाननिष्ठ कर्मयोगी

डॉ. वैद्य यांची शारीरिक व त्यापेक्षाही मानसिक प्रवृत्ति किती काटक, कणखर व निकोप आहे याची एक गोष्ट अनुभवास आलेली सांगावीशी वाटते. काही दिवसापूर्वी ते पुणे येथील बसने प्रवास करीत असताना वरच्या आडव्या गजाला धरून उभे होते. बस थांबतेवेळी जोराने धक्का बसून त्यांच्या गजाला धरून असलेल्या हाताला जोराचा हिसका बसला व तो खांद्याच्या खोबणीतून निखळला. वैद्य तसेच हात सावरून आपला बस-स्टॉप येईपर्यंत थांबले. पुढे एका मित्राच्या साहाय्याने डॉक्टरांकडे गेले. डॉक्टरांनी तो हात परत ठिकाणी बसविला. वैद्य बँडेजमध्ये हात अडकवून घरी गेले व लगेच तसेच पुन्हा भांडारकर-संस्थेच्या आपल्या कार्यालयात येऊन आपल्या नित्याच्या कार्यात निमग्न झाले. त्यांचा बँडेजमध्ये हात पाहून तेथील लोकांनी विचारले असता, त्यांनी झालेला वृत्तान्त सांगून " विशेष काही झाले नाही, हाताला थोड्याशा झिणझिण्या येत आहेत, त्या जातील " असे हसत हसत सांगितले. त्यांच्या वयोमानाकडे बघता, त्यांच्या या शारीरिक व त्यापेक्षा मानसिक अशा कार्यमग्न कर्मयोगी प्रकृतीचे कौतुक वाटल्याशिवाय रहात नाही.

आज डॉ. वैद्य हे हरिवंशांच्या संशोधन-संपादनात निमग्न आहेत. हस्तलिखिते मिळविणे, दररोज अनेक हस्तलिखितातील पाठभेदांची नोंद व तुलना करणे, त्यातून अधिकृत मूळ पाठ ठरविणे, पाठ-












भेदांची सविस्तर माहिती देऊन. अनधिकृत श्लोकांची परिशिष्टे तयार करणे, त्यानंतर अशारीतीने ठरलेली संहिता छापायला पाठविणे, ती शुद्ध होईपर्यंत वारंवार मुद्रिते पाहणे हे त्यांचे काम त्यांच्या सहकाऱ्यांनिशी दैनंदिन चालू आहे. हे काम ५।७ वर्षे हरिवंश पुरे होईपर्यंत चालणार आहे. डॉ. वैद्य यांनी अशा प्रकारच्या आवृत्तिसंशोधन-संपादनाच्या कामास सुरुवात १९१६ साली ' मयूरसंस्कृत काव्यानि ' या पुस्तकाच्या रूपाने केली. तेव्हापासून आजपर्यंत सुमारे ५० वर्षे त्यांचा हा ग्रंथांच्या संशोधनसंपादनाचा उद्योग अखंडपणे चालू आहे. याशिवाय महाभारतकार्याचाच एक भाग म्हणून महाभारतात आलेल्या सर्व श्लोकांच्या चरणांची अकारादि विल्हे सूची तयार करून छापावयाची आहे. अशा चरणांच्या नोंदी एकंदर सुमारे ५ लाखांवर सहज होतील. अशी ही प्रचंड सूचि पुरी करून, ती आद्याक्षरानुसार लावून छापखान्याला देण्याकरिता तिची एक प्रत (Press Copy) तयार करणे हे काम अजून व्हावयाचे आहे. त्याची तपशीलवार आखणी डॉ. वैद्य करीत आहेत. या त्यांच्या कामाच्या व्यापातच कोणी एखादे सभासंयोजक वा संपादक त्यांच्याकडे येऊन बौद्ध वा जैन धर्म व तत्त्वज्ञान यासंबंधी भाषण वा लेख देण्यासंबंधी आग्रहपूर्वक विनंति करतात. त्यावेळी वैद्य हसत म्हणतात. "अहो, या माझ्या नित्याच्या किचकट कामामुळे माझे डोके सध्या इतके भरून गेले आहे की इतर विषयांना त्यात आता वाव नाही." पण तरीही शेवटी एखादे भाषण वा लेख देतातच. याशिवाय भारतातील नागपूर, दिल्ली, सागर इत्यादि अनेक विद्यापीठांच्या संस्कृत, प्राकृत, पालि आदि भाषांच्या तज्ज्ञ-समितींवर ते नियुक्त सदस्य म्हणून आहेत. म्हणून त्यांना त्या त्या समितीच्या सभांना जावे लागते. ते पुष्कळ वेळा म्हणतात : " मी आता त्यांना सांगितले आहे की माझे नाव आता कमी करा. मी आता हा व्याप कमी करणार आहे. " तरी पण त्यांचे या क्षेत्रातील अद्वितीय स्थान, विद्यापीठांशी त्यांचे असलेले जुने ऋणानुबंध यांमुळे त्यांना निमंत्रणे स्वीकारावी लागतातच. असा त्यांचा कामाचा उदंड व्याप व उरक त्यांच्या वयाच्या ७५ व्या वर्षी चालू आहे. त्यांचा पिंड ज्ञाननिष्ठ कर्मयोग्याचा आहे, याला आणखी कोणती निराळी साक्ष पाहिजे ?

---





अनुक्रमणिका

प्रा. मे. पुं. रेगे

# अल्बर्ट श्वाइटझर–जीवनकार्य

आल्बर्ट श्वाइट्झर गेल्या ५ सप्टेंबर रोजी लँबरीनी येथे आपल्या कर्मभूमीवर मृत्यू पावले. कित्येक दीर्घायुषी, दीर्घोद्योगी, समकालीन समाजातील प्रातिनिधिक प्रवृत्तींचे धुरीणत्व करणाऱ्या व्यक्ती म्हणजे आपल्या ओळखीच्या, सवयीच्या मानवी जगाचे आवश्यक, कायमचे घटक असल्यासारख्या होऊन बसतात. त्यांच्या मृत्यूने झालेल्या हानीच्या विचारापेक्षाही काहीतरी अनपेक्षित, जिच्यासाठी आपल्या मनाची पूर्वतयारीच नव्हती अशी घटना घडल्याचा येणारा अनुभव अधिक सुन्न करणारा असतो. श्वाइट्झर हे अशा व्यक्तींपैकी एक होते. त्यांच्या सबंध जीवनाचा आणि विचारांचा आढावा घेण्याचा ह्या लेखाचा उद्देश नाही. फक्त त्यांच्या जीवनकार्याच्या कित्येक पैलूंचे दर्शन घेण्याचा आहे.

आल्बर्ट श्वाइट्झर ह्यांचा जन्म १४ जानेवारी १८७५ ला अलसेस मधल्या कायसर्सबर्ग ह्या गावी झाला. त्यांचे आजोबा पंतोजी होते आणि वडील कायसर्सबर्ग गावाचे प्रॉटेस्टंट धर्मगुरु होते. त्यांच्या आईचे वडील हेही धर्मगुरु होते. श्वाइट्झर ह्यांचे दोन्ही आजोबा, पण विशेषतः आईचे वडील ऑर्गन वाजविण्यात पटाईत होते. संगीतविद्येचा वारसा श्वाइट्झर ह्यांना दोन्ही बाजूकडून मिळाला होता.

श्वाइट्झर ह्यांची जातकुळी, परंपरा ध्यानात घेण्यासारखी आहेत. ते आल्सेशिअन होते आणि आल्सेशिअन लोक वृत्तीने, संस्कृतीने फ्रेंच पण भाषेने जर्मन आहेत. आधुनिक युरोपिअन संस्कृती उभारण्यात ज्यांचा प्रमुख वाटा आहे त्या फ्रेंच आणि जर्मन राष्ट्रांना जोडणारा (पण त्यांच्यात अनेकदा वादविषय झालेला) दुवा म्हणजे आल्सेशिअन लोक. ह्या सांस्कृतिक द्विधाभावाचे निरसन करण्याचा सर्वात सोपा, सरळमार्ग म्हणजे शंभर टक्के फ्रेंच किंवा जर्मन बनण्याचा अट्टहास सोडून देऊन युरोपिअन बनणे. पॅरिस किंवा बर्लिनच्या नागरिकांपेक्षा एकादा आल्सेशिअन अधिक सहजपणे 'चांगला युरोपिअन' बनू शकतो. दोन संहारक भ्रातृयुद्धानंतर आलेल्या उपरतीतून 'चांगले युरोपिअन' बनण्याची आवश्यकता अनेक युरोपिअन विचारवंतांना मनोमन पटली. परंतु ह्याच्या कितीतरी पूर्वीपासून, अगदी सहजपणे, श्वाइट्झर चांगले युरोपिअन म्हणून जगत होते. त्यांच्या सांस्कृतिक निष्ठेला राष्ट्रीय अभिनिवेशाची मर्यादा कधी पडली नाही, किंवा संकुचित राष्ट्रीय संस्कृतीच्या कोशातून बाहेर पडून अधिक व्यापक दृष्टिकोण साधण्याचा प्रयत्नही त्यांना करावा लागला नाही. सबंध युरोपिअन संस्कृतीचा संपन्न वारसा त्यांनी नैसर्गिकपणे स्वीकारला आणि जतन केला. त्यांची परंपरा फ्रेंच किंवा जर्मन नव्हती; ती युरोपिअन होती.

## प्रॉटेस्टंट प्रेरणा

आणि ती प्रॉटेस्टंट धर्मगुरूंची होती. ज्या अनेक भिन्न सांस्कृतिक प्रेरणांच्या संगतीतून, संघर्षातून, ताणातून आधुनिक युरोपिअन संस्कृतीचा पट विणला गेला आहे त्यामध्ये प्रॉटेस्टंट प्रेरणा अत्यंत महत्त्वाची आहे. ही प्रामुख्याने आध्यात्मिक, नैतिक प्रेरणा आहे. ह्या प्रेरणेचा सर्वात विशुद्ध, प्रखर आविष्कार प्यूरिटन पंथात आढळतो. पण सामान्यतः आधुनिक युरोपिअन संस्कृतीला ह्या प्रेरणेने भक्कम नैतिक कणा मिळवून दिला आहे असे म्हणता येईल. 'सत्यावरील आत्यंतिक निष्ठा' असे ह्या प्रेरणेचे स्वरूप वर्णन करता येईल. कॅथलिक पंथ हा एक प्राचीन, परंपरागत, सर्वसंग्राहक धर्मपंथ होता. सर्व सृष्टीत ईश्वरी प्रेमाचा विशुद्ध आविष्कार पहाणारे गूढवादी, आध्यात्मिक साधनेच्या आड येणाऱ्या सर्व इच्छांचे, वासनांचे निर्दयतेने दमन करणारे साधक, घटपटाच्या खटपटीत रमणारे, धार्मिक अनुभवाला प्रतीत झालेल्या अंतिम तत्त्वांचा शोध, त्यांची स्थापना बुद्धीच्या साहाय्याने करू पाहणारे तत्त्ववेत्ते ख्रिस्ताच्या व्यक्तित्वाचा आणि जीवनाचा आदर्श स्वतःपुढे ठेवून प्राणिमात्राच्या प्रेमळ सेवेत अंतिम श्रेय शोधणारे संत, इमान राखण्यासाठी प्राण द्यायला, घ्यायला सदैव तयार असणारे आडदांड, रांगडे योद्धे, सर्व वस्तूंची किंमत करणारे, सर्व व्यक्तींना साधने म्हणून राबवू शकणारे धूर्त राजकारणी, भोळीभाबडी, गतानुगतिक जनता ह्या सर्वांना चर्चमध्ये स्थान होते; नव्हे, ह्या सर्वांच्या आध्यात्मिक कल्याणाची जबाबदारी चर्चने स्वीकारलेली होती. रोमन साम्राज्याच्या पडत्या काळात युरोपिअन समाजाची घडी चर्चने सावरून धरली होती. जगाच्या उलाढालीत








भाग घेतला होता. ईश्वराचे पृथ्वीवरील प्रतिनिधी म्हणून वावरणाऱ्या चर्चमधाल सर्वश्रेष्ठ व्यक्तींच्या अंगी मानवी दुर्बलतेच्या खाणाखुणा स्पष्टपणे पाहिल्या होत्या. ऐहिक जीवनाचा मोह किती प्रबळ असतो हे अनेक शतकांच्या अनुभवाने चर्चला चांगले अवगत झाले होते; विशुद्धतम म्हणून मानल्या जाणाऱ्या आध्यात्मिक प्रवृत्तीतील सूक्ष्म मालिन्य चर्च ओळखू शकत होते. आणि म्हणून मानवाच्या आध्यात्मिक घडपडीकडे पहाण्याची चर्चची वृत्ती उदार, सहिष्णु होती. ऐहिक वासनांच्या आडव्या तिडव्या वाहणाऱ्या झोतात मानवाच्या आध्यात्मिकतेची ज्योत जतन करणे हे चर्चचे कार्य. हे प्राथमिक कार्य पार पाडण्यासाठी दुय्यम बाबतीत तडजोड करायला चर्च तयार असे. अनेकांशी अनेक भाषात चर्च बोलू शकत असे; वेगवेगळ्या प्रवृत्तींच्या आणि अधिकाराच्या व्यक्तीसाठी त्यांना रुचतील अशी विविध रूपे चर्च धारण करीत असे.

ही तडजोड, ही संग्राहक वृत्ती प्रॉटेस्टंटाना अमान्य होती. सत्याचा स्वीकार करणे हे जसे कर्तव्य आहे तसेच असत्याचा अव्हेर करणे हेही कर्तव्य आहे अशी त्यांची शिकवण होती. सत्याच्या एकमेव पायावर व्यक्तीच्या आंतरिक आणि बाह्य जीवनाची उभारणी करण्याची त्यांची आकांक्षा होती. ज्या आंतरिक प्रवृत्ति, वासना, विचार सत्याला विरोधी असतील त्यांचे सतत दमन करीत रहाणे, ज्या रूढी, व्यक्तीव्यक्तीतील जे संबंध, सामाजिक संस्था आणि मूल्ये सत्याशी प्रतारणा करीत असतील त्यांच्याशी झगडत रहाणे, आणि त्यांच्यात रूपांतर घडवून आणणे ही प्रॉटेस्टंटाच्या नैतिक साधनेची उद्दिष्टे होती. प्राप्त परंपरा, प्रचलित संस्था ह्यांची मोडतोड करून त्यांच्याजागी नवीन संस्थांची उभारणी करण्यासाठी जे नैतिक सामर्थ्य आवश्यक असते ते प्रॉटेस्टंट प्रेरणेत निश्चितपणे होते. आणि ह्या प्रेरणेच्या प्रभावाने युरोपिअन सामाजिक आणि आध्यात्मिक जीवनाचे आधुनिक काळात आमूलाग्र रूपांतर घडून आले. ज्या सत्याच्या प्रस्थापनेसाठी प्रॉटेस्टंट् झगडले ते सत्य त्यांना ईश्वराच्या शब्दात, बायबलमध्ये गवसले होते. पण सत्य आणि ईश्वराचा शब्द ह्यांच्यामध्येच जर विरोध निर्माण झाला असता तर त्यांनी काय केले असते ? त्यांच्या मूळ निष्ठेप्रमाणे त्यांना सत्याशी इमान राखणे आवश्यक झाले असते.

१९ व्या शतकाच्या उत्तरार्धात प्रॉटेस्टंट नैतिक प्रेरणा जरी पहिल्याइतकीच दृढ होती तरी ती पहिल्या इतकी उग्र आणि कर्कश राहिली नव्हती, विज्ञान, कला, साहित्य ह्यांचा युरोपिअन संस्कृतीत परपोष झाला होता आणि ह्या संस्कृतीच्या संदर्भात ह्या प्रेरणेने स्वरूपही सौम्य झाले होते. पण तिच्यातील निष्ठा आणि उत्कटता तिळमात्रही कमी झाली नव्हती हे आपल्याला श्वाइट्झरच्या जीवनावरूनच कळून यईल.

## संगीतात प्रावीण्य

शालेय जीवनात श्वाइट्झर एक हुषार असाधारण बुद्धिमत्तेचे विद्यार्थी म्हणून चमकले नाहीत. पण संगीताची देणगी त्यांना लाभली होती हे लवकरच उघडकीला आले. वयाच्या आठव्या वर्षापासूनच ते ऑर्गन वाजवू लागले होते. माध्यमिक शाळेत-Gymnasium- प्रवेश केल्यानंतर यूजीन म्यूंश ह्या संगीतशिक्षकाच्या शिकवणीचा लाभ त्यांना झाला. ह्या शिकवणीमुळे त्यांचा दुहेरी फायदा झाला. एक तर ऑर्गन वाजविण्याचे शास्त्रशुद्ध तंत्र त्यांनी हस्तगत केले. आणि, दुसरे म्हणजे, म्यूंशमुळे बाखच्या संगीताशी त्यांचा परिचय झाला. श्वाइट्झर ह्यांच्या संगीतसाधनेत बाखच्या संगीताला नेहमीच मध्यवर्ति स्थान मिळत गेले आणि पुढे त्यांनी बाखच्या संगीताचे विवरण करणारे एक पुस्तक फ्रेंचमध्ये आणि नंतर, स्वतंत्रपणे, जर्मनमध्येही प्रसिद्ध केले. संगीताची साधना म्हणजे श्वाइट्झर ह्यांच्या दृष्टीने एक छंद किंवा करमणूक नव्हती. संगीत, त्यांच्या दृष्टीने, गभीर व्यासंगाचा एक विषय होता. ऑर्गन हे वाद्य आणि त्याच्यावर वाजावण्याचे आराधना-संगीत ह्यांचे मूळ स्थान ख्रिश्चन उपासनेत असले तरी हळूहळू ह्या संगीत प्रकाराचा शुद्ध कला म्हणून उत्कर्ष होत गेला होता. श्वाइट्झर ह्यांनी ऐन उमेदीच्या काळात ऑर्गनवर पहिल्या दर्जाचे प्रावीण्य संपादन केले होते. युरोपात, विशेषतः फ्रान्स आणि जर्मनीमध्ये, संगीताला सांस्कृतिक जीवनात महत्त्वाचे स्थान होते ( आणि आहे ). प्रतिभावान् रचनाकारांच्या ( composer ) संगीतकृती आत्मसात् करणे, त्यांच्या स्वरूपाचे विश्लेषण करणे, त्यांचा अर्थ लावणे, ह्या गोष्टी बिकट आहेत; त्या साधण्यासाठी श्रेष्ठ दर्जाची बुद्धिमत्ता आणि व्यासंग आवश्यक असतात. श्वाइट्झर ह्यांनी संगीतकलेत संपादन केलेले प्रावीण्य आणि अधिकार एवढा उच्च












होता की कुणीही माणूस आपल्या जन्मभरची कामगिरी म्हणून तिचा अभिमानाने उल्लेख करू शकला असता. पण हा सर्व कमाई श्वाइट्झर ह्यांच्या जीवनाचा एक भाग होता. ऑर्गनवरील प्रावीण्याचा एक व्यावहारिक फायदा मात्र श्वाइट्झर ह्यांना झाला. आयुष्याच्या अखेरच्या टप्प्यावर जेव्हां त्यानी आपले अंतिम उद्दिष्ट निश्चित केले तेव्हा ते साध्य करण्यासाठी आवश्यक असलेली आर्थिक मदत आणि लोकांची सहानुभूति मिळविताना ऑर्गनवरील पटुत्वाचा उपयोग त्यांनी करून घेतला.

## धर्मतत्त्वांचा शोध

शालेय शिक्षणक्रम पुरा केल्यावर श्वाइट्झर ह्यांनी स्ट्रासबुर्ग विद्यापीठात प्रवेश केला. धर्मशास्त्र ( Theology) आणि तत्त्वज्ञान हे विषय त्यांनी अभ्यासासाठी निवडले. विश्वविद्यालयीन अभ्यासक्रम पार पाडताना त्यांच्या असाधारण बुद्धिमत्तेचा आणि स्वतत्र प्रज्ञेची चमक दिसून आली. विद्यार्थी म्हणून धर्मशास्त्राच्या परीक्षेची तयारी करण्यासाठी त्या विषयाचे वाचन करीत असतानाच गाढ्या, मातब्बर पंडितांनी जन्मभरच्या व्यासगानंतर जी अनेक मते बनविली होती आणि जे विचार पुढे मांडले होते ते श्वाइट्झर ह्यांना अग्राह्य वाटू लागले होते. धर्मशास्त्राचा त्यांचा व्यासंग नंतर जन्मभर चालूच राहिला. श्वाइट्झर कुलपरंपरेने धर्मगुरु होते. आणि विद्यापीठाची पदवी प्राप्त करून घेतल्यानंतर त्यानी स्वतःही धर्मगुरु म्हणून कित्येक वर्षे काम केले. खिस्ती धर्मगुरूंची दैनंदिन कामे करायला त्याना आवड. सांघिक उपासना चालविणे, धर्मतत्त्वावर प्रवचने देणे, आपल्या परिसरातील धर्मबांधवासाठी ( किंवा पंथबांधवासाठी ) धार्मिक विधीचे, संस्कारांचे पौरोहित्य करणे, त्यांची काळजी घेणे ही खिस्ती धर्मगुरूंची दैनंदिन कर्तव्ये होत आणि ही कामे करण्याची श्वाइट्झर ह्यांना मनापासून आवड होती. पुढे आफ्रिकेत गेल्यावर कॅथलिक मिशनच्या समवेत काम करताना त्यांच्यावर कित्येक धार्मिक निर्बंध घालण्यात आले होते– उदा. त्यांनी धार्मिक प्रवचने करायची नाहीत, धार्मिक चर्चेत भाग घ्यायचा नाही, इ.– आणि ह्या निर्बंधामुळे त्याना चुकल्याचुकल्यासारखे होत असे. पण ह्या दैनंदिन कार्यक्रमात ते कधी गुरफटून गेले नाहीत. धर्मतत्त्वांचा शोध घेण्याचा आपला प्रयत्न त्यांनी नेटाने चालूच ठेवला. सत्य हे जीवनातील सर्वात महत्त्वाचे मूल्य आहे आणि सत्य स्वतः जाणून घेण्याचे स्वातंत्र्य जसे प्रत्येक व्यक्तीला असले पाहिजे त्याप्रमाणे ते जाणून घेण्याचा प्रयत्न स्वतः करणे हे प्रत्येकाचे कर्तव्य आहे हे मानणाऱ्या प्रॉटेस्टंट परंपरेतील ते एक होते. पण ज्या धार्मिक सत्याचा शोध श्वाइट्झर ह्यांना लागला तो शोध तत्कालीन प्रस्थापित प्रॉटस्टंट मताला विरोधी असा होता.

## येशूख्रिस्ताची पारलौकिक विचारसरणी

हे प्रस्थापित मत साधारणपणे असे होते. धार्मिक सत्य हे अखेरीस बायबलवर, विशेषतः नव्या करारावर आधारलेले असले पाहिजे. ह्या नव्या कराराचा गाभा म्हणजे मार्क, मॅथ्यू इ. येशूच्या अनुयायांची शुभ वर्तमाने व येशूच्या जीवनाच्या आणि शिकवणीच्या त्यानी दिलेल्या हकीकती. पण ह्या वेगवेगळया वृत्तांतात अनेक परस्परविसंगती आढळतात. नवा करार हा ईश्वराचा शब्द खरा; पण इतर लौकिक ग्रंथाप्रमाणे ह्या ग्रंथाचेही ऐतिहासिक दृष्टिकोणातून अनेक उपलब्ध प्रतींचे साहाय्य घेऊन चिकित्सा केली तर ईश्वराचे नेमके शब्द कोणते, मानवांनी अनवधानतेने किंवा कोणत्यातरी हेतूने प्रक्षिप्त केलेले शब्द कोणते, आण ईश्वरी शब्दांचा नेमका अर्थ काय ह्या प्रश्नांची उत्तरे देणे कठीण होऊन बसते. कॅथलिक पंथाला ही अडचण पडत नाही; कारण ईश्वराचे शब्द आणि त्यांचा अर्थ निश्चित करण्याचे कार्य हे खिस्ती आध्यात्मिक परंपरेचे विश्वस्त असलेल्या चर्चचे आहे, कुणाही व्यक्तीचे नाही, असे त्या पंथाचे म्हणणे आहे. उलट, केवळ नव्या कराराचा अर्थ नीट लावला, मानवी स्खलनशीलता यहुदी धर्मपरंपरा इत्यादीमुळे नव्या करारात शिरलेले हिणकस जर आपण दूर केले आणि येशूची शिकवण शुद्ध स्वरूपात समजावून घेतली तर सत्याचे दर्शन आपल्याला होईल ही प्रॉटेस्टंट भूमिका आहे. बायबलची अशा प्रकारे चिकित्सा करून ख्रिस्ताची शिकवण शुद्ध स्वरूपात काय होती ह्या विषयीचे एक मत प्रॉटेस्टंटांनी बनवले होते आणि ह्या मतावर उदारमतवादी प्रॉटेस्टंट पंथाची उभारणी झाली होती. हे मत थोडक्यात असे होते : ख्रिस्ताची शिकवण मुख्यतः आध्यात्मिक, नैतिक होती. ईश्वर प्रेमस्वरूप आहे आणि ईश्वरावर आणि ईश्वराच्या सर्व लेकरांवर कृतिशील प्रेम करा हा ख्रिस्ताचा मूळ संदेश आहे. शुभवर्तमानात नमूद केलेल्या

अनेक गोष्टी– उ. खिस्ताने केलेले चमत्कार ( miracles ) प्रक्षिप्त आहेत; त्यांचा खिस्ताच्या जीवनाशी किंवा शिकवणीशी साक्षात् संबंध नाही. सुसंस्कृत धर्माची उभारणी ज्याच्यावर करता येईल असेच हे मत होते. त्याचा वैज्ञानिक वृत्तीशी, विज्ञानाने लावलेल्या शोधांशी, विज्ञानांत विश्वाच्या स्वरूपाचे आपल्याला जे दर्शन होते त्याच्याशी फारसा विरोध आला नसता. शिवाय ह्या शिकवणीची आध्यात्मिक बाजू जरी एकाद्या संशयवादी व्यक्तीला अमान्य असली तरी तिचा नैतिक गाभा मान्य करायला तिला कोणतीच अडचण पडण्यासारखी नव्हती. तेव्हा बायबलची चिकित्सा करून ज्याच्या आधाराने धर्माची उभारणी करता येईल असे सत्य त्यापासून हस्तगत करता येते असे प्रॉटेस्टंट मत होते. पण श्वाइट्झर ह्यांनी बायबलविषयी केलेल्या संशोधनाचा निष्कर्ष ह्या मताला विरोधी ठरला. कारण श्वाइट्झर ह्यांचे म्हणणे असे आहे की येशूची शिकवण अशी केवळ आध्यात्मिक, नैतिक नव्हती. डेव्हिडच्या वंशात एक 'अभिषिक्त' सम्राट् ( Messiah, The Annointed ) निर्माण होणार आहे आणि हा मेसाया आल्यानंतर ह्या पार्थिव जगाचा अंत होईल आणि मेसायाचे दैवी राज्य सुरू होईल अशी ज्यू लोकात परंपरागत समजूत होती. हा मेसाया म्हणजे आपण स्वतः असे येशूला वाटत होते. त्याच्या अनुयायांचा त्याच्यावर विश्वास होता तो त्याच्या मेसाया ह्या स्वरूपावर होता. जे स्वर्गाचे राज्य येशूच्या अनुयायांना येशूवरील त्यांच्या श्रद्धेमुळे मिळणार होते ते पृथ्वीवर लवकरच अवतीर्ण व्हायचे होते. ईश्वरावर, त्याच्या लेकरांवर निःस्वार्थी प्रेम करणे आणि ह्या उत्कट प्रेमाचा उदात्त अनुभव घेणे म्हणजेच ईश्वराच्या राज्याचा आपल्या अंतरात्म्यात अनुभव घेणे हे 'ईश्वराचे स्वर्गीय राज्य' ह्या कल्पनेचे पुढे झालेले अध्यात्मीकरण, उदात्तीकरण होय. येशूच्या मूळ शिकवणीप्रमाणे मेसायाचे ईश्वरी अपार्थिव खरेखुरे राज्य लवकरच अवतीर्ण व्हायचे होते; हे राज्य त्याच्या स्वतःच्या आधिपत्याखाली अवतीर्ण व्हायचे होते आणि त्याच्या भक्तांना आणि अनुयायांना ह्या राज्यात स्थान लाभणार होते. तेव्हा येशूची शिकवण केवळ आध्यामिक, नैतिक नव्हती; ती पारलौकिकही होती. इहलोकाचा अंतकाल जवळ आला आहे, त्याचे लवकरच परलोकात खरेखुरे रूपांतर व्हायचे आहे, ह्या क्रांतिकालात आपण वावरत आहोत अशी येशूची आणि त्याच्या अनुयायांचीही समजूत होती. येशूच्या शिकवणीला ही जशी पारलौकिक बाजू होती तशीच नैतिक बाजूही होती. ईश्वर केवळ प्रेमस्वरूप आहे आणि भूतमात्रावर प्रेम करण्यात जीवनाचे खरेखुरे साफल्य आहे हा येशूचा नैतिक संदेश होता आणि जगाच्या इतिहासात हा नैतिक विचार संपूर्णपणे नवा होता. पण येशूच्या आचारविचारात, त्याच्या अनुयायांच्या वागणुकीत खिस्ती धर्माच्या आदियुगात ह्या नैतिक तत्त्वाला आणि त्यावर आधारलेल्या नीतिमत्तेला जी चौकट होती ती येशूच्या ह्या पारलौकिक विचारांची.. ऐहिक जग लवकरच संपुष्टात येणार आहे ही येशूची आणि त्याच्या अनुयायांची समजूत खोटी ठरली आणि खिस्ती नीतीची परत उभारणी करावी लागली.

खिश्चन धर्माच्या आदियुगात आणि विशेषतः नव्या करारात प्रचलित असलेल्या धार्मिक मतांचे नेमके स्वरूप काय होते ह्या प्रश्नावर संशोधन करण्यात श्वाइट्झर ह्यानी आपल्या ऐन उमेदीची अनेक वर्षे खर्ची घातली. The mystery of the kingdom of God, the Quest of the Historical Jesus, the mysticism of Paul, the Apestle हे ग्रंथ म्हणजे ह्या संशोधनाची ठळक फळे होत. जर्मन पंडिती संशोधनाच्या परंपरेत शोभून दिसतील असे हे ग्रंथ होत. पण हे संशोधन केवळ बौद्धिक कुतूहलातून, पांडित्याची परंपरा पुढे चालू ठेवण्याच्या बौद्धिक ईर्ष्येतून निर्माण झाले नव्हते. त्यांच्यामागची प्रेरणा जेवढी बौद्धिक तेवढीच नैतिकही होती. येशूच्या शिकवणीमध्ये जर अग्राह्य भाग असेल तर तो वगळन केवळ ग्राह्य भाग तेवढा स्वीकारणे योग्य ठरेल. पण असे करायचे तर येशूची शिकवण नेमकी काय होती हे समजून घेतले पाहिजे आणि हे ह्या संशोधनाचे उद्दिष्ट होते. आणि खिश्चन नीति जर चूक, आधुनिक काळात ज्याचा स्वीकार करता येणार नाही अशा तत्त्वज्ञानावर आधारलेली असेल तर अधिक सुप्रतिष्ठित तत्वावर तिची उभारणी करणे आवश्यक आहे ह्या गोष्टीकडेही विचारवंतांचे लक्ष वेधणे हे ह्या संशोधनाचे उद्दिष्ट होते. बायबलच्या भारुडातून खिस्ताचा विशुद्ध संदेश गाळून काढता येईल आणि त्याच्या आधारावर नैतिक व आध्यात्मिक जीवनाची उभारणी करता येईल ही

उदारमतवादी प्रॉटेस्टंटांची समजूत फोल ठरली. खिस्त-प्रणीत आध्यात्मिक जीवनाला वैचारिक आधार देण्या-साठी एक नवीन तत्त्वज्ञान निर्माण करणे आवश्यक झाले होते.

## खडतर सेवाभावी जीवनाचा स्वीकार

यशाचे नवीन नवीन टप्पे आक्रमत संगीताच्या साधनेत गढून गेले असताना, वैचारिक संशोधनाला अनेक मातबर, मौलिक नावाजलेल्या ग्रंथांच्या रूपाने दृश्य फळे येत असलेली दिसताना वयाच्या तिसाव्या वर्षी श्वाइट्झर यांनी ह्या संपन्न आणि समाधानी सांस्कृतिक जीवनाचा त्याग करून खडतर सेवाभावी जीवनाचा स्वीकार करण्याचे ठरवले. हा निर्णय त्यांनी आकस्मिकपणे घेतला नव्हता. संगीतविद्येची, प्रति-भेची, बुद्धीची अमाप देणगी त्यांना लाभली होती आणि तिच्या सहज लीलया होणाऱ्या आविष्कारातून त्यांच्या जीवनाचा संपन्न आशय रचला जात होता. पण आपल्या वाट्याला आलेले हे सुदैव, असाधारण सुख कृतज्ञतेने स्वीकारून त्याच्यात गुंग होऊन रहाणे अयोग्य होय असे त्यांना वाटत होते. ह्या सुखाचा मोबदला आपण दिला पाहिजे आणि हा मोबदला केवळ निरपेक्ष सेवेच्या रूपानेच देता येईल असे त्यांना नेहमीच वाटत आले होते. वयाच्या तिसाव्या वर्षा-पर्यंत ज्ञानाची व कलेची साधना आपण करीत रहाणे योग्य ठरेल पण त्यानंतर मात्र माणसांची प्रत्यक्ष सेवा करण्यात आपण आयुष्य घालविले पाहिजे असे त्यांनी मनाशी ठरवले होते. आणि ती वेळ येताच आपला निर्णय त्यांनी शांतपणे अमलात आणण्याची तयारी सुरू केली.

हा निर्णय अमलात आणणे अर्थात् सोपे नव्हते. एका अर्थाने संपत्तीचा, सांसारिक सुखाचा त्याग करणे कठीण नसते. कारण ह्या गोष्टीचा मोह कितीही प्रबळ असला तरी तो मोह व म्हणून त्याज्य आहे अशी आपली वृत्ती असते; आणि ह्या मोहावर विजय मिळवला तर नैतिक साफल्याचा आनंदही आपण अनुभवतो. पण ज्ञानाच्या किंवा कलेच्या साधनेत रमून जाण्याच्या आपल्या प्रवृत्तीला आपण कदाचित् मोहच मानणार नाही. जी ईश्वरी देणगी आपल्याला मिळाली आहे तिचा योग्य त्या क्षेत्रात उपयोग करीत रहाणे हे आपले कर्तव्यच आहे असे आपण समजू. यशाचा, साफल्याचा आनंद, कर्तृत्वाचा अभिमान हे मनोभाव त्याज्य आहेत आणि त्यांच्याविषयी आपण जागरूक राहिले पाहिजे हे आपण मान्य करू. पण हे भाव केवळ आनुषंगिक आहेत, खरी गोष्ट ही की कलेच्या किंवा ज्ञानाच्या साधनेवर आपण आपले लक्ष एकाग्र केले पाहिजे आणि आपल्या सर्व शक्ती एकवटून ही साधना तडीला नेली पाहिजे आणि ही गोष्ट साधली की आपण ईश्वराविषयीचे व मानवाविषयीचे आपले कर्तव्य पुरेसे बजावले असे होईल अशी आपण आपली समजूत करून घेऊ. श्वाइट्झर ह्यांनाही असा उपदेश प्रामाणिकपणे, पोटतिडिकेने करण्यात आला; पण आपल्या निश्चयापासून ते ढळले नाहीत. "Who-soever would save his life shall lose it, and whosoever shall lose his life for My sake shall save it."

श्वाइट्झर यांनी आपले कार्यक्षेत्र म्हणून काँगोची निवड केली हा केवळ योगायोग होता. काँगो मिशनला कोणकोणत्या गोष्टीची जरूरी होती हे सांगणारी एक पुस्तिका त्यांच्या टेबलावर होती. ती ते चाळीत होते. त्यांनी शेवटले वाक्य वाचले ते असे होते : " देवाच्या हाकेला जे अगदी सहज सरळ 'ओ' देऊ शकतात अशा माणसांची चर्चेला जरूरी आहे." हे वाक्य वाचल्यावर कोठले कार्यक्षेत्र निवडावे हा त्यांचा शोध संपला. काँगोला जायचा निर्णय त्यांनी शांतपणे घेतला. आणि काँगोला मुख्यतः वैद्यकीय साहाय्याची डॉक्ट-रांची जरूरी आहे हे कळताच आपली सेवा खरीखुरी सेवा करण्यासाठी त्यांनी वैद्यकीय शिक्षण घ्यायचे ठरविले आणि वयाच्या सदतिसाव्या वर्षी आपला दुसरा शिक्षणक्रम पुरा केला.

श्वाइट्झर ह्यांनी घेतलेला हा निर्णय इतका लोकविल-क्षण होता की त्याच्या मागची त्यांची भूमिका समजा-वून घेणे उद्बोधक ठरेल. ते म्हणतात की, आपण काहीतरी विशेष करावे असे अनेकांना वाटते. पण असे वाटणे त्यांच्या अस्वस्थतेचे, अस्थिरतेचे निदर्शक असते. त्यांच्या समोरचे, लगतचे कर्तव्य करण्यात त्याना राम वाटत नाही. काहीतरी भव्य आपल्या हातून घडावे, कोणत्यातरी महान् कामगिरीला आपण वाहून घ्यावे असे त्याना वाटत असते. परंतु प्रत्येक प्राप्त कर्तव्य जो सारख्याच एकात्मतेने आणि निष्ठेने करतो त्यालाच आपली नेहमीची कर्तव्ये सोडून कोणत्या तरी असामान्य ध्येयाला वाहून घेण्याचा निर्णय

घेण्याचा आंतरिक अधिकार असतो. पण असा माणूस आपण काहीतरी विशेष करतो आहो, आपले वर्तन धीरोदात्त आहे अशा भावनेने असला निर्णय घेत नसतो; एक निवडीचे कर्तव्य, आपण पार पाडलेच पाहिजे असे एक कर्तव्य आपण करीत आहो एवढीच त्याची भावना असते. अशा माणसाचे नैतिक असामान्यत्व त्याने मोठ्या कामगिरीला वाहून घेण्याचा निर्णय घेतला त्याच्यात सामावलेले नसते; तर ही कामगिरी पार पाडताना तो जो संयम, तितिक्षा, त्यागवृत्ती, सहनशीलता दाखवीत असतो त्याच्यात असते. पण मोठ्या कामगिरीला वाहून न घेतलेल्या, सर्वसाधारण सांसारिक जीवांच्या अंगी सुद्धा हे नैतिक गुण तेवढ्याच प्रकर्षाने असू शकतात. " There are as heroes of action; only heroes of renunciation and suffering. "

आजची परिस्थिती अशी आहे की जवळ जवळ प्रत्येकाला आपल्या स्वतःच्या किंवा कुटुंबाच्या पालनपोषनासाठी काहीतरी रोजगार करावाच लागतो. स्वतःच्या किंवा कुटुंबियांच्या हितापलीकडल्या एकाद्या ध्येयाला वाहून घेणे फारच थोड्या माणसांना आज जमू शकते. आणि म्हणून माणसात जी ध्येयनिष्ठा आहे तिचा फारच थोडा अंश प्रत्यक्ष कृतिद्वारा प्रकट होऊ शकतो. पण स्वतःचा रोजगार, पेशा ह्यांच्या बंदिखान्यातून स्वतःची सुटका माणसाला करून घेता येते. ह्या सुटकेचा मार्ग म्हणजे स्वतःपलीकडील व्यक्तींचे कल्याण साधण्याची जेव्हा जेव्हा संधी येते तेव्हा तेव्हा ती तत्परतेने उचलणे आणि तशी प्रत्यक्ष कृती करणे. माणूस कोणत्याही परिस्थितीत असो इतरांची सेवा करण्याची संधी थोड्या फार प्रमाणात त्याला मिळत असतेच. आणि अशी सेवा करूनच माणूस, मानव जातीचा एक घटक म्हणून, एक मानवी व्यक्ती म्हणून स्वतःचे व्यक्तिमत्त्व प्रस्थापित करू शकतो. आपण एऱ्हवी समजतो तितकी माणसे जडवादी किंवा सुखलोलुप नसतात. श्वाइट्झर म्हणतात, माणसांची त्यांना जी ओळख झाली आहे तिच्यावरून ह्या जगात आपली समजूत आहे तिच्यापेक्षा कितीतरी अधिक ध्येयवाद आहे. पण तो आपल्याला दिसून येत नाही, अप्रकट रहातो कारण सेवेची आलेली प्रत्येक संधी आपण उचलून धरीत नाही. माणसांच्या मनात कोंडून राहिलेल्या ध्येयवादाला जर कुणी मोकळी वाट करून दिली तर आपल्या दृष्टीला येईल; हे करू शकणाऱ्या व्यक्तींची वाट पहात आज मानवजात तिष्ठत आहे.

काँगोतील अरण्यात लांबरीनी येथील वसाहतीत आफ्रिकन लोकाची श्वाइट्झर ह्यांनी जी दीर्घकाल सेवा केली ती सर्वांना माहितीच आहे. श्वाइट्झर ह्यांच्या आफ्रिकन लोकांच्या कल्याणाविषयीच्या कल्पना, आफ्रिकनांच्या त्यांनी केलेल्या सेवेमागील वृत्ती वादविषय झाल्या आहेत ही गोष्ट नमूद करणे आवश्यक आहे. स्वायत्त, स्वावलंबी समाज उभारण्याचे प्रचंड ऐतिहासिक कार्य करण्यात गढून गेलेल्या आफ्रिकनांना आपण इतरांच्या सेवाभावाचा विषय असावे आणि कायमचे रहावे ही गोष्ट फारशी संतोषजनक ठरू नये हे नैसर्गिकच आहे. पण श्वाइट्झर ह्यांचे विचार, कल्पना कशाही असोत त्यांचा भाव नेहमी शुद्धच होता असे त्यांच्या जीवनवृत्तीशी ज्याचा थोडाफारही परिचय आहे असा कुणीही म्हणेल.

संगीत आणि तत्त्वचिंतन मागे ठेवून प्रत्यक्ष कृतीच्या द्वारे केवळ सेवा करण्यासाठी काँगोत आलो आहो अशी श्वाइट्झर ह्यांची कल्पना होती. परंतु खिस्तासाठी जो आपले जीवन गमावतो त्यालाच जीवनाचा लाभ होतो ह्या वचनाची प्रचीति त्यांना लवकरच आली. त्यांना पॅरिस बाख् सोसायटीने एक ऑर्गन भेट म्हणून दिला आणि फुरसतीच्या वेळी संगीताची साधना त्यांनी चालू ठेवली. संगीत त्यांच्या जीवनाच्या धारणेला आवश्यक असलेली वस्तू होती. तिचाही परित्याग करण्याची त्यांची तयारी होती पण दैवाने तसे घडू दिले नाही. आणि १९१४ चे महायुद्ध सुरू झाले तेव्हा एक जर्मन नागरिक म्हणून त्यांना गिरफदार करण्यात आले आणि फ्रान्समध्ये परत नेण्यात आले. ह्या कालखंडात अर्थात् त्यांनी स्वीकारलेल्या सेवाव्रतात खंड पडला पण अंतर्मुख होऊन युरोपिअन संस्कृतीच्या स्वरूपाविषयी आणि भवितव्याविषयी विचार करण्याची संधी त्यांना मिळाली. इतर युरोपिअन विचारवंतांप्रमाणे ह्या युद्धाने ते व्यथित झाले होते. पण हे युद्ध म्हणजे युरोपिअन संस्कृतीला जडलेल्या एका विकृतीचे केवळ एक बाह्य लक्षण आहे अशीच त्यांची कल्पना होती.

### संस्कृतीची तत्त्वमीमांसा

ही विकृती कोणती ? संस्कृतीची धारणा कशाने होते, तिचा अभ्युदय कशाने होतो आणि ऱ्हास कशाने

होतो ? ह्या विचारमंथनातून श्वाइट्झर ह्यांचे संस्कृतीचे तत्त्वज्ञान बाहेर पडले. युरोपियन संस्कृतीचे स्वरूप, तिच्या मागच्या प्रेरणा नीट समजून घेण्यासाठी त्यानी भारतीय आणि चिनी संस्कृतीचाही अभ्यास केला आणि त्यांची धारणातत्त्वे उलगडून पहाण्याचा प्रयत्न केला. ह्या विचारमंथनाचे सार थोडक्यात असे देता येईलः संस्कृतीची धारणा तिच्या मागे असलेल्या, तिला तोलून धरणाऱ्या एका विवक्षित विश्वदर्शनात ( Worldview ) असते. संस्कृतिमागील प्रेरणा कोणती ? तर व्यक्तीची आणि समाजाची प्रगती सतत घडून आणण्याची प्रेरणा. भौतिक आणि आध्यात्मिक प्रगती ह्या दोन्ही सांस्कृतिक प्रगतीचे घटक आहेत. पण ही प्रगती मुख्यतः नैतिक प्रगती असते. आता ही प्रगतीमागील प्रेरणा एका विश्वदर्शनावर आधारलेली असते. विश्वाचे हे दर्शन दोन प्रकारचे असू शकते. एक म्हणजे अस्तित्वाचे दर्शन; विश्वाला आणि जीवनाला होकार देणारे दर्शन ( World-and-Life-affirmation ). दुसरा प्रकार म्हणजे नास्तित्वाचे दर्शन; विश्वाला आणि जीवनाला नकार देणारे दर्शन. विश्वाला आणि जीवनाला होकार देणे, आपले अस्तित्व टिकवून धरण्याचा प्रयत्न करणे ही जीवमात्राची नैसर्गिक प्रवृत्ती आहे. पण असे नैसर्गिक जीवन जगणे म्हणजे विश्वाला आणि जीवनाला वैचारिक होकार देणे नव्हे; अस्तिवाची दर्शन घडवणे नव्हे. उलट, अस्तित्वाची अभिलाषा नैसर्गिक असल्यामुळे विश्वाला व जीवनाला नकार देणे हे वैचारिक दर्शनामुळेच शक्य होते हे उघड आहे. विश्वाला-जीवनाला होकार देणे म्हणजे अस्तित्वाचे, जीवनाचे मूल्य मान्य करणे आणि अधिकाधिक मूल्याची निर्मिती मानवी प्रयत्नाने करता येणे शक्य आहे आणि तसे करणे हे माणसाचे कर्तव्य आहे हे मानणे. उलट, विश्वाला-जीवनाला नकार देणे म्हणजे अस्तित्वाचे अंतिम मूल्य नाकारणे आणि मानवी प्रयत्नाने मूल्ये निर्माण करता येतात किंवा साध्य करता येतात हेही नाकारणे. ह्या दर्शनाचे व्यावहारिक पर्यवसान, इंद्रियनिग्रहात, इंद्रियदमनात, सर्वकर्मांचा त्याग करणाऱ्या संन्यासपंथात होते. श्वाइट्झर ह्यांच्या मते भारतीय तत्त्वज्ञान आणि विश्वसांस्कृतिक परंपरा प्रामुख्याने नास्तिवाची विश्वदर्शनावर आधारलेली आहे; अस्तिवाची परंपरेचा एक धागा भारतीय संस्कृतीच्या पटात असला तरी प्रामुख्याने ही संस्कृती नास्तिवाची आहे. उलट, युरोपिअन तत्त्वज्ञान व संस्कृती प्रामुख्याने अस्तिवाची आहे. ग्रीक व रोमन संस्कृतीच्या ऱ्हासाच्या काळात, मध्ययुगात नास्तिवाची दर्शनाचा पगडा युरोपिअन संस्कृतीवर पडला असला तरी तिची मध्यवर्ती प्रवृत्ती अस्तिवाची आहे. रेनेसाँपासून तर ह्या अस्तिवाची प्रवृत्तीचा परिपोष झालेला आहे. आणि ह्या प्रवृत्तीमुळे युरोपिअन लोक यत्नप्रवण राहून त्यांची भौतिक, सांस्कृतिक प्रगतीही झाली आहे. पण एकाद्या लोकसमूहात अस्तिवाची प्रवृत्ती असणे ह्याचा अर्थ त्या लोकसमूहाची संस्कृती अस्तिवाची दर्शनावर आधारलेली असते असे नव्हे. कारण अस्तिवाची दर्शनाचा एक आवश्यक घटक म्हणजे जीवनाविषयीचे एक नैतिक दर्शन. ह्या नैतिकदर्शनामुळे माणसामध्ये नैसर्गिकपणे असलेल्या अस्तिवाची प्रवृत्तीचे अस्तिवाची दर्शनात रूपांतर होते. हे नैतिक दर्शन ज्या मध्यवर्ति मूल्यावर आधारलेले आहे ते मूल्य म्हणजे जीवनाविषयीचा पूज्यभाव (Reverence for life) ह्या जीवनाविषयीच्या पूज्यभावाने व्यक्तीची स्वतःची जगण्याची प्रेरणा अधिक उत्कट बनते पण त्याबरोबरच इतरांच्या जीवनाच्या सर्व अविष्कारांचेही व्यक्ती स्वागत करते आणि त्यांचाही उत्कर्ष साधण्याचा प्रयत्न करते. जीवनाविषयीचा पूज्यभाव हा ज्याचा एक आवश्यक घटक आहे असे अस्तिवाची दर्शनच सदैव प्रगतशील राहू शकेल अशा संस्कृतीची धारणा करू शकेल. आधुनिक युरोपीय संस्कृतीचा दोष हा कि तिच्या मागचे नैतिक दर्शन क्षीण झाल्यामुळे तिचा अस्तिवाद केवळ प्रवृत्तिस्वरूप राहिला. अस्तिवाची दर्शनाचा तिला आधार नसल्यामुळे ही प्रवृत्ती स्वैर व निरंकुश झाली. ख्रिस्ताचे प्रेमाचे तत्त्वज्ञान म्हणजे अस्तिवाची असे नैतिक तत्त्वज्ञान होते; पण ऐहिक जीवनाच्या अंतकाळी आपण ते उद्घोषित करीत आहो अशी ख्रिस्ताची कल्पना असल्यामुळे ह्या अस्तिवाची नैतिक तत्त्वज्ञानाला नास्तिवाची विश्वदर्शनाची चौकट त्याने दिली. ख्रिस्ताच्या ह्या नास्तिवाची दर्शनाचा त्याग करून त्याच्या अस्तिवाची नैतिक दर्शनाला वैचारिक दृष्टिकोणाचा आधार प्राप्त करून देणे हे तत्त्वज्ञानाचे प्राप्त कार्य आहे. श्वाइट्झर ह्यांच्या ह्या तात्त्विक विचारांचे विवरण व परीक्षण करणे आवश्यक आहे.

( अपूर्ण )








# सार-संकलन

## कम्युनिस्ट चीनचे नेतृत्व

कम्युनिस्ट चीन व माओ हे अनेकांना समानार्थी शब्द वाटतात ; चीनच्या कम्युनिस्ट पक्षावर गेली तीस वर्षे ही एकच व्यक्ती आपल्या मूठभर सहकाऱ्यां-सह प्रभुत्व गाजवीत असल्याने असे वाटणे स्वाभाविक आहे. १९४९ सालापासून पेकिंग राजवट ही यांच्याच हुकमतीखाली आहे.

माओनंतर हे लहानसे वर्तुळ दुसऱ्या कोणाभोवती तरी उभे राहील असा कयास आहे. पण हळू हळू थोडीशी वयानें लहान असलेली मंडळी पुढे येणारच. "क्रांतीचे वारसदार" म्हणून ज्या तरुण नेत्यांवर आजच्या राजवटीनें लक्ष केंद्रित केले आहे, ते या गटात मोडत नाहीत. १९४९ च्या क्रांतीत भाग घेतलेले हे दुसऱ्या रांगेतील नेतृत्व कर्तृत्वाऐवजी आज्ञाधारकपणामुळे महत्त्व पावलेले आहे. याचे भावी काळावर परिणाम होणे अपरिहार्य आहे.

या दुय्यम श्रेणींच्या नेतृत्वाचे १९५५ व १९६५ सालांतील स्वरूप ध्यानात घेतल्यास काही गोष्टी सहज ध्यानात येतात. हे नेतृत्व बरेचसे स्थिर आहे. वडचा नेत्यांप्रमाणेच ते दिवसेंदिवस वृद्धत्वाकडे घोडदौड करीत आहे. विशिष्ट भौगोलिक भागातील लोकांना त्यात प्राधान्य आहे. त्यातील व्यक्ती दुय्यम थरातच या स्थानावरून त्या स्थानावर जातात; वरिष्ठ स्थानावर जाणारांचे प्रमाण कितीतरी कमी आहे.

संयुक्त आघाडीचे राजकीय डावपेच चालू असताना कम्युनिस्टेतर व्यक्तींना गौण राजकीय स्थाने दिली जात. आता हे धोरण बदलत आहे. कम्युनिस्ट पक्षाचे वर्चस्व अधिकाधिक पक्के होत आहे. त्याबरोबरच प्रादेशिक संबंध, आणि व्यक्तिगत संबंध वा भक्ती यांचे जुन्या काळातील राजकीय वर्तनावरील प्राबल्य अजूनही कायम आहे.

या दुय्यम श्रेणीच्या नेतृत्वात गेल्या दहा वर्षात बराच बदल झाला आहे हे खरे. पक्षाच्या सत्तावीस प्रादेशिक चिटणिसांपैकी सोळा हे १९५५ सालापेक्षा भिन्न आहेत. सत्तावीस गव्हर्नरांपैकी पंधरा नवे आहेत. केंद्र सरकारच्या १९५५ मधील एकोणचाळीस मंत्र्यां-पैकी तेवीस त्या स्थानावर नाहीत, आणि चार भिन्न खात्यांचे मंत्री आहेत. १९६५ मध्ये मंत्र्यांची संख्या एकुणपन्नास झाली असून त्यापैकी तेहतीस जण १९५५ नंतर मंत्रीपदावर आलेले आहेत. तथापी स्टालीनच्या राजवटीत झालेले बदल ध्यानात घेतल्यास हे आकडे विशेष मोठे नाहीत. या नेतृत्वाची स्थिरता लोकांच्या मनावर ठसावी असा मुद्दाम प्रयत्न केला जातो आणि होणारे बदल शक्यतो गाजावाजा न करता होत असतात.

१९५५ साली मंत्र्यांचे सरासरी वय ५६ होते, आज ते ६२ आहे. प्रादेशिक पक्षचिटणीस व गव्हर्नर यांचे १९५५ मधील सरासरी वय ४९ होते; आज ते ५८ आहे. तरुण व्यक्तींना पुरेशा बढत्या मिळत नसल्याने ही सरासरी वाढत आहे. तथापी त्यामुळे लवकरच सेवानिवृत्तीचे व मृत्यूचे प्रमाण वाढणेही अपरिहार्य आहे.

हे नेतृत्व राष्ट्रीय दृष्टचा पुरेसे प्रातिनिधिक नाही. दुसऱ्या श्रेणीच्या शहात्तर नेत्यांच्या जन्मस्थानाविषयी माहिती मिळाली आहे. तिच्यावरून त्यातील चौतीस नेते वरिष्ट नेत्यांच्याच म्हणजे हुनान, कियांगसी, झेश्वान व शेन्सी या प्रांतातील आहेत. अवघी २२ टक्के लोकसंख्या असलेल्या प्रांतातील लोकांनी ४५ टक्के जागा आडवल्या आहेत. उलट ईशान्य व नैऋत्येकडील प्रांतांची लोकसंख्या सुमारे १४ टक्के असूनही त्यांच्याकडे अवघ्या चार जागा आहेत. भौगोलिकदृष्टचा नेतृत्वाचे हे प्रातिनिधिक स्वरूप दहा वर्षांच्या अवधीत कितीतरी कमी झाले आहे. संयुक्त आघाडीचे राजकारण मागे पडत असल्याने नेतृत्वातील कम्युनिस्ट पक्षाचे वर्चस्व वाढत आहे. व इतर पक्षांची माणसे कमी होत आहेत. न्याय, संस्कृती, शिक्षण, दळणवळण इत्यादींसारखी खाती आजवर कम्युनिस्टेतर मंत्र्यांकडे होती ती आता कम्युनिस्टांकडेच आहेत.



अनुक्रमणिका






प्रांतीयवाद चीनच्या राजकारणात यापूर्वी होता व अजूनही आहे. अवघे ११ गव्हर्नर आणि ८ पक्ष-चिटणीस आपापल्या प्रांतातच अधिकारपदावर आहेत. प्रांतीयतेच्या राजकीय जाणीवेमुळे कम्युनिस्ट पक्ष दुय्यम श्रेणीच्या नेत्यांना आपापल्या प्रांतात ठेवण्यास विशेष उत्सुक असत नाहीत असा अनुभव आहे. परंतु त्याबरोबरच जे नेते आपापल्या प्रांतात आहेत त्यांच्या-बाबतीत प्रांतीक भावनेपेक्षा पक्षाची विचारसरणी व पक्षप्रेम ही अधिक महत्त्वाची आहेत असा कम्युनिस्ट दृष्टीकोण आहे.

चिनी राजकारणातील दुसरा विघटक घटक म्हणजे गटबाजी. हाही अजून कायम आहे. उदा. टेंग शिआओ-पिंग हा गेल्या दहा वर्षात प्रथम श्रेणीतील नेता म्हणून मानण्यात येऊ लागला आहे. त्याच्या उत्कर्षा-बरोबरच त्यांच्या कित्येक वैयक्तिक सहकाऱ्यांनाही बढती मिळाली आहे. आजच्या ४९ मंत्र्यांपैकी नऊ मंत्री त्यातले आहेत. पॉलिटब्यूरोचे दुसरे एक सभासद लिशिएन-नीन यांचेही उदाहरण अशाच प्रकारचे आहे. अशी इतरही अनेक उदाहरणे देता येतील. नेतृत्वातील ही गटबाजीची उदाहरणे ध्यानात घेतल्यास, आजचे बडे नेते गेल्यानंतर, चिनी राज-कारण व ध्येयधोरण यावर त्याचे विघटक व फाटाफूट पाडणारे परिणाम घडून येण्याचा संभव आहे. बडे नेतेदेखील वैयक्तिक निष्ठा, सामान्य अनुभव इत्यादींमुळे एकत्र आलेले आहेत. त्यांना जोडणारी बंधनेही व्यक्तिगतच आहेत. यामुळे त्यांचे राजकीय स्थान एका प्रकारे गटबाजीवरच आधारलेले आहे; तिचाच पाठपुरावा ते करीत असतात. यामुळे गट-बाजीवर ते हल्ला करू शकत नाहीत.

दहा वर्षांपूर्वी अस्तित्वात असलेल्या वरिष्ठ स्थानांची संख्या आता वाढली असल्याने अधिकांश लोकांना बढती मिळणे शक्य झाले आहे. दहा मंत्रालये वाढली; पक्षाच्या प्रादेशिक कचेऱ्या वाढल्या; उपमंत्र्यांची संख्या १९३ वरून ३१०वर गेली असून उपराज्यपालांच्या संख्येतही १४५ वरून २३३ पर्यंत वाढ झाली आहे. तथापी एकंदरीने सर्वच स्थानांची संख्या वाढत आहे. "प्रमोशन" बरोबरच बदल्या, "डिमोशन" इत्यादीचे प्रमाणही वाढत आहे. तथापी द्वितीय श्रेणीच्या नेतृत्वाच्या ऐक्याचा देखावा कायम ठेवण्याची सतत धडपड चालू असते. यामुळे कोणत्या धोरणाला कितपत पाठिंबा आहे याचा कयास घेणे कितीतरी जिकीरीचे होते. बदल्या, बढती वा 'डिमोशन' यांचे स्वरूपही कित्येकदा स्पष्ट होत नाही. त्याची कारणेही अनेकवेळा दिली जात नाहीत.

बदल्या या एका प्रदेशातून दुसऱ्यात नेतात किंवा नोकरशाहीच्या एका विभागातून दुसऱ्यात. उदा. सरकारी अधिकारी जनता संघटनकार्यात जाईल, किंवा लष्करी अधिकारी सार्वजनिक सुरक्षिततेच्या क्षेत्रात येईल. तथापी या निरनिराळ्या क्षेत्रात आपली बढती करू इच्छिणारे प्रस्थापित हितसंबंधियांचे गट आता तयार होऊ लागले आहेत असा एक अंदाज आहे. तो खरा असल्यास त्या योगाने कम्युनिस्ट पक्षाच्या प्राथम्यास धोका पोहोचणे शक्य आहे. वरिष्ठ पक्ष-नेत्यांनाही याची जाणीव असावीसे दिसते. सर्व क्षेत्रा-तील विशिष्ट हितसंबंधियांनी कम्युनिस्ट पक्षाच्या हिताची जपणूक करावी. या दिशेने त्यांची धडपड सुरू आहे. तथापी संघटनात्मक दृष्टीने पक्षाची देखील वाहतुक व दळणवळण, व्यापार, उद्योगधंदे, आंतर-राष्ट्रीय संबंध, संघटनकार्य, प्रचार, ग्रामीण कार्य आणि संयुक्त आघाडीची कामे अशा आठ भागात विभागणी झाली आहे. यामुळे एकायंत्रणेतून दुसरीत बदली होऊ शकते. तथापी सामान्यतः व्यक्तीला यातील एकाच भागात कायम राखण्यावर कटाक्ष असतो.

बढत्यांची उदाहरणे थोडीशी काळजीपूर्वक तपा-सल्यास एक महत्त्वाची प्रवृत्ती ध्यानात येते, ती म्हणजे १९५९-६१ सालानंतर बढत्या मिळून प्रथम श्रेणीत गेलेले नेते हे बव्हंशी लोकांवर हुकुमत गाजवण्याच्या क्षेत्राशी संबंधित होते, ही होय. १९५९-६० चा काळ हा आर्थिक व सामाजिक अरिष्टाचा काळ होता. या काळात लोकांवर ताबा ठेवण्यासाठी त्यांच्यावर जुलूम व दडपशाही करणे हे एकच साधन होते. यामुळे ही जुलमाची साधने ज्यांच्या हाती होती त्यांना आपली चलती करून घेणे शक्य झाले.

तात्पर्य, वरिष्ठ नेत्यांना, विशिष्ट भागात वा क्षेत्रात पक्षनिष्ठेऐवजी तंत्रज्ञानाच्या आधारावर पुढारी-






अनुक्रमणिका





पणाकडे आलेल्या व्यक्तींविषयी चिंता वाटते. तथापी चिनी नेत्यांविषयी करण्यात येणारे कोणतेही अंदाज हे केवळ तात्कालिक स्वरूपाचे म्हटले पाहिजेत. वरिष्ठ नेत्यांचा वारसा कोणाकडे जाणार हा प्रश्न तेथे अजून निर्माण व्हावयाचा आहे. व तो निर्माण होताच या राज्यपद्धतीचे स्वरूप अधिक स्पष्ट होऊ लागेल. शिवाय, चीनविषयी आवश्यक माहितीही पुरेशी मिळत नाही. यामुळे चीनसंबंधीच्या कोणत्याही विधानात एक प्रकारची अनिश्चितता नेहमीच असते हे उघड आहे.

[ हाँगकांग येथील "करंट सीन– डेव्हलपमेंटस् इन् मेनलँड चायना", १ ऑगस्ट १९६५. ]

## चीनचा डाव

भारत-पाकिस्तान युद्धात चीन हस्तक्षेप करणार असे समजायला सबळ राजकीय कारणे आहेत; तथापी गेले दोन आठवडयात चीनने चालविलेल्या कांगावखोरपणाकडे दुर्लक्ष न करायला सबळ लष्करी कारणे आहेत. ही लष्करी कारणे म्हणजे भारताच्या हिमालयातील सीमेवर असलेल्या चिनी सेनेच्या सुसज्ज व उत्तम तयारी असलेल्या पाच सहा तुकडया ही होत. सिंकियांग– तिबेट भागातील चिनी सैन्य-बळाविषयीचे निरनिराळे अंदाज सामान्यतः एक ते तीन लाख इतके आहेत. एक लाख हा अंदाज भारताच्या सीमाप्रदेशातील सैन्याइतका आहे. भारतीय सैन्याची सोळा ते आठरा हजारांची एक तुकडी लडाखमध्ये असून अशा सहा तुकडया सिक्कीम, आसाम व नेफा भागात आहेत. उलट, तीन लाख हा अंदाज घेतल्यास येथील चिनी सैन्य पाकिस्तानच्या सर्व सैन्यापेक्षा अधिक आहे असे म्हणावे लागेल.

१९६२ साली चिनी सेनेपुढे भारताने पीछेहाट पत्करली. तेव्हापासून या क्षेत्रात दोन्ही बाजूंनी आपापले सैन्य सुसज्ज बनवण्याचा, साधने व दळण-वळण सुधारण्याचा प्रयत्न केला आहे. भारताची परिस्थिती तुलनात्मकदृष्टया सुधारली असेलही, पण पाकिस्तानशी युद्ध सुरू होण्यापूर्वी या प्रदेशात चीन अधिक प्रबळ होता. भारताने या आघाडीवरून मोठ्या प्रमाणात सैन्य हालविण्याचे टाळले आहे हे खरे. पण पूर्व पाकिस्तानावर हल्ला करावयाच्या हेतूने केलेल्या लष्करी हालचालींमुळे भारताच्या नेफातील संरक्षणफळी दुर्बळ झाली असणे शक्य आहे.

आपण होऊन किंवा पाकिस्तानच्या विनंतीवरून चीन ही संधी साधू शकतो. सीमेवरील भारतीय संरक्षण फळी चाचपून पाहाणे किंवा सरळ आसामवर चाल करणे यातील एक हेतू त्यात असेल. परंतु चिनी सेनेला इतरही काही अडचणी आहेत. भारताच्या बाजूने अमेरिका उलट फटका देईल हे तर झालेच. तथापी तिबेटमध्ये 'गॉरिला' (गनिमी सैनिक) लष्करी महत्त्वाचे तळ व साधनसामुग्री यांचा विध्वंस करीत आहेत असेही वृत्त आहे ; यामुळेही अडचण आहे. रसद तोडली गेल्यास युनान प्रांतातून ती मागविता येईल. पण तेथून यावयाचा खुष्कीचा मार्ग ब्रह्मदेशातून जात असल्याने अडचण आहे. ब्रह्मी सरकारशी मैत्रीचे संबंध असले तरी चीनला ते इतके साहाय्य करील की नाही हाही एक प्रश्नच आहे.

लडाखमधील भारतीय ठाण्यांना अलीकडे भेट देऊन आलेले लोक भारतीय सेनेचे नीतिधैर्य उत्तम असल्याचे सांगतात. आणि चीनशी सामना द्यावा लागल्यास भारतीय सेना तो पूर्वेकडील सीमेपेक्षा येथे अधिक चांगल्या रीतीने देईल असा निरीक्षकांचा अंदाज आहे. चीनचे सिंकियांगमध्ये ५०००० ते १६०,००० सैन्य असावे असा अंदाज आहे ; तथापी रशियादेखील सीमाप्रश्न निर्माण करून अडचण आणणार नाही ना, याविषयी चीनला सतत सावध राहावे लागेल. भारत-पाकिस्तान लढयात रशियाने निर्धाराने तटस्थतेची भूमिका घेतली व त्याबरोबरच चीनला थोडीफार तंबीही दिली आहे. यामुळे चीनने उत्तर सिंकियांगमधून लडाखमध्ये सेना आणायची म्हटल्यास रशिया स्तब्ध राहणार नाही अशी त्याला भीती वाटते.

चीनच्या २० ते २५ लाख सेनेपैकी बव्हंशी सेना उत्तर व्हिएटनामसीमा, फॉर्मोसासमोरील प्रदेश, आणि ईशान्य चीनच्या प्रदेशात आहे. भारतीय सीमेवर युद्ध झाल्यास ती अतिशय दूर असल्याने हिशेबात धरता येणार नाही. तथापी चीनचे तिबेटमधील सैन्यदेखील दक्षिणेकडे सरकल्यास चालू कलहाचे












( भारत-पाकिस्तान ) स्वरूप बदलून टाकण्यास पुरेसे आहे यात शंका नाही.

—इकॉनमिस्ट (लंडन), १८-२४ सप्टेंबरवरून.

## सोव्हिएट शल्यविद्येची प्रगती

मेंदूतील रक्तपेशींतील बिघाड आणि रोग शस्त्रक्रियेने बरे करता येणे शक्य आहे. मेंदूतील रक्तवाहिन्यात बदल झाल्याकारणाने मृदु कवचाखाली रक्तस्राव होतो व अनेकदा त्यात माणसाचा अंत होतो हे आपल्याला फार दिवसापासून ठाऊक आहे. सर्वात दुर्दैवाची गोष्ट म्हणजे असा रक्तस्राव केवळ मध्यमवयीन लोकांनाच नव्हे, तर तरुणांना आणि अगदी लहान मुलांनादेखील होतो, अशा रक्तस्रावांची संख्या जास्त का आहे. ते मेंदूच्या शस्त्रक्रियेच्या नव्या पद्धतीने शोधून काढले आहे. त्यासाठी मेंदूतील रक्तवाहिनीत अेक पदार्थ सोडण्यात येतो व त्यायोगे क्ष-किरणांच्या साहाय्याने त्या रक्तवाहिन्यांतील फेरबदल स्पष्ट दिसतात.

मेंदूतील रक्तवाहिन्या विकल वा दुर्बल झाल्यामुळे मेंदूत रक्तस्राव होतो, असे आढळून आले आहे. त्यायोगे रक्तवाहिन्यांची नलिका कमकुवत होते आणि ठिकठिकाणी ती फाटून जाते.

रक्तस्रावाची कारणे शोधल्यानंतर, मेंदूतील रक्तवाहिन्यांवर होणारे वेगवेगळे परिणाम अभ्यासल्यानंतर या रक्तवाहिन्या विकल वा दुर्बळ होण्यावर शस्त्रक्रियेने उपचार करण्याची कल्पना सुचली. या क्षेत्रातील सध्याचे विजय प्रोत्साहन देणारे आहेत.

जादा रक्तदाब असल्यामुळे, रक्तवाहिनीत क्षार गोळा झाल्यामुळे ती चोंदल्याकारणाने मेंदूत होणारे रक्तप्रवाहही अत्यंत गंभीर स्वरूपाचे असतात. त्यावर पूर्वीचे, पारंपरिक उपाय परिणामकारक नव्हते.

ही स्थिती शस्त्रक्रियातज्ज्ञांना मंजूर होणे शक्यच नव्हते. आमच्या अनेक वैद्यक संस्थांतून अशावेळी शस्त्रक्रियांचे प्रयोग करण्यात येऊ लागले. सुरवातीच्या प्रयोगांना खूपच यश मिळाले. त्यानंतर मेंदूतील रक्तस्राव थांबविण्यासाठी सदैव शस्त्रक्रियेचा अवलंब करण्यात येऊ लागला.

याचा अर्थ असा नव्हे की, मेंदूतील रक्तवाहिन्यांवरील शस्त्रक्रियेसंबंधीचे सारे काही स्पष्ट आहे व सर्व अडचणींवर मात करण्यात आली आहे. परंतु शस्त्रक्रियेच्या या शाखेची आम्ही इतर वैद्यक शाखांतील तज्ज्ञांच्या मदतीने प्रगती घडवून आणली आहे. प्रचंड संशोधन-कार्य आमच्यापुढे आहे. संशोधन चालू आहे व फलनिष्पत्ती उत्साहदायी आहे, हे महत्त्वाचे आहे. त्यायोगे मेंदूतील नव्या रोगांवर शस्त्रक्रियेद्वारे उपचार करण्याची शक्यता वाढते.

मेंदूतील गळवांच्या संदर्भातही अलीकडील वर्षात बरेच संशोधन करण्यात आले आहे. अशी गळवे झालेल्या रोग्यांची हृदये आणि फुप्फुसे देखील चांगल्या रीतीने काम करू शकत नाहीत. या अडथळ्याविरुद्ध योजलेले उपाय आजवर निष्फळ ठरत आलेले आहेत.

पुनःसंजीवन पद्धतीमुळे अशा गळवावरील उपाययोजनेच्या बाबतीत मूलतःच फरक पडला आहे. कृत्रिम श्वासोच्छ्वासाची उपकरणी, रक्ताभिसरण पुन्हा सुरू करणारी अगदी नवी औषधे वगैरेंमुळे ही पुनःसंजीवनपद्धती यशस्वी ठरली आहे.

कपाळावरील शिरेत किंवा मेंदूत गळवे झाल्यामुळे मेंदूला आलेली सूज, गांठी वगैरे नाहीशा करण्याच्या कामी अवघड शस्त्रक्रियेनंतर मोठे यश मिळविण्यात आले आहे. अेन्. अेन्. बुदेन्को यांनी लिहून ठेवले आहे की, मेंदूची सूज जो घालवू शकेल, त्याच्या हाती रोग्याच्या आयुष्याची दोरी असेल.

जीवरसायनशास्त्र आणि औषधविद्या यांचा विकास झाल्याने मेंदूची सूज कमी करणारी उत्कृष्ट नवी औषधे उपलब्ध झालेली आहेत. 'युरिया' व त्यापासून तयार होणारी इतर विविध औषधे ही या भयानक शत्रूविरुद्ध लढण्याची आमची महत्त्वपूर्ण शस्त्रे होत. शस्त्रक्रिया करण्यापूर्वी मेंदूच्या त्या रुग्णाइत भागावर 'युरिया' आदि औषधे लावल्याने शस्त्रक्रिया करणाऱ्या डॉक्टरांना मोठेच क्षेत्र उपलब्ध झाले आहे. ज्या जागा आजवर शस्त्रापासून अत्यंत दूर मानल्या जात होत्या, तेथेही आता उपकारक शस्त्र पोचू शकते. ते शस्त्र चालविणाऱ्याच्या कसबाबरोबरच संमोहनशास्त्र आणि पुनःसंजीवन-पद्धती यांतील यशाकडेही मज्जा-शस्त्रक्रिया शाखेतील यशाचा वाटा जातो. अलीकडेच याकामी किरणोत्सारी अणूंचाही वापर करण्यात

आला; तो केवळ संशोधनात नव्हे, तर निदान करण्यासाठी व उपचार करण्यासाठीही ! नव्या उपकरणासहित ही नवी पद्धत अधिक मोठ्या प्रमाणावर वापरण्यात येईल.

हृदयातील रक्ताभिसरणात अडथळे निर्माण झाले की, त्या भागातील स्नायूंना आवश्यक तेवढे रक्त मिळत नाही व घातक अशा टाकाऊ पदार्थापासून ते स्वतःची मुक्तता करून घेऊ शकत नाहीत, म्हणजेच त्यांना शक्तीचे उगमस्थान असलेल्या ग्ल्युकोजचा पुरेसा पुरवठा होत नाही.

आजवर डॉक्टर रोग्यांना वाचविण्यासाठी रोगशमनविद्येनुसार उपचार करीत असत. पण ते तात्कालिक परिणाम करणारे ठरत म्हणून सुमारे ५० वर्षापूर्वी शस्त्रक्रियेचा वापर या रोगाविरुद्ध सुरू झाला.

प्रथमतः डॉक्टरांनी रक्तवाहिन्या नियंत्रित करणाऱ्या केन्द्रावर प्रभाव पाडण्याचे प्रयत्न करून पाहिले पूरक-वाहिनी काढून टाकल्यामुळे धमनी विस्तृत होण्यास मदत होत असे. त्याहूनही अधिक गुंतागुंतीच्या शस्त्रक्रिया केल्या जात असत. पेशींनी मूळ धरले की, त्यातून हृदयाकडे रक्ताचा पुरवठा सुरू होई. कधी कधी रक्ताचा प्रवाह अडविणारी गाठ बांधून ठेवली जाई. धमनीवर कलम देखील करण्यात येई पण या पद्धती सदैव गुणकारी ठरत नसत.

प्रा. वासिली कोलेसोव यांच्या मार्गदर्शनाखाली लेनिनग्राद मेडिकल इन्स्टिटयूटमधील पहिल्या रुग्णालयात हृदयावरील शस्त्रक्रियेची नवी पद्धत वापरण्यात आली आहे.

प्रारंभी या शस्त्रक्रियेचे प्रयोग कुत्र्यांवर करण्यात आले. त्यांच्या धमनीचा व्यास २-३ मिलीमीटर असतो. अशावेळी अत्यंत बिनचूकपणा आवश्यक असतो. शिवाय, शस्त्रक्रिया होत त्या जिवंत हृदयावर, कोरडया किंवा अलग काढलेल्या हृदयावर नव्हे. याचाच अर्थ असा की, डॉक्टरला फारच थोडा वेळ उपलब्ध असे. थोडा विलंब झाल्यास रक्तपुरवठ्यात अडथळा येई व अखेरीस हृदय बंद पडे.

मे १९६४ मध्ये माणसाच्या हृदयावर पहिली शस्त्रक्रिया करण्यात आली. अद्ययावत् विद्युत्-उपकरणी शरीराच्या अवस्थेवर देखरेख करीत होती. डॉक्टरांनी छातीतील धमनीची तपासणी केली. प्रा. कोलेसोव यांनी, खराब झालेला भाग सभोवतालच्या पेशींपासून अलग काढला आणि थोड्याच वेळात हृदयाचे काम सुरू झाले. कोलेसोव यांना फक्त पाच ते सात मिनिटांचा अवधी मिळाला होता. परंतु ही शस्त्रक्रिया यशस्वी करायला या अनुभवी डॉक्टरला एवढा वेळ पुरेसा होता.

सहा आठवडे झाले. रोग्याला रुग्णालयातून रजा देण्यात आली. कालांतरानेच शस्त्रक्रियेची यशस्विता सिद्ध होणार होती. अलिकडेच हा रोगी तपासणीसाठी रुग्णालयात आला होता. आता त्यांच्या हृदयात तीव्र कळा येत नाहीत. अंगमेहनतीचे देखील काम तो करू शकतो.

अशाच प्रकारच्या शस्त्रक्रिया अनेक रोग्यांवर करण्यात आल्या आहेत. त्या सगळ्यांना त्यायोगे बरे वाटले.

—सोविएट समाचार ,१८ सप्टेंबर १९६५.

## भारतीय संस्कृतीचा
## ३००० वर्षांचा मूल्यवान ठेवा

दरसाल भारतातून अनेक पाहुणे लेनिनग्रादला येतात. नेवा नदीवरील प्रासादालाही ते अचूक भेट देतात. तूर्त या प्रासादात 'आशियाई जन-संस्थेची' लेनिनग्राद शाखा कार्यमग्न आहे.

भारतापासून हजारो मैल दूर असलेल्या या प्रासादात भारतीय संस्कृतीचा मूल्यवान् ठेवा—असंख्य भारतीय हस्तलिखिते—जतन करून ठेवलेली आहेत. त्यामुळे त्यांचे दर्शन घेण्याची उत्सुकता प्रत्येक भारतीयाला वाटणे स्वाभाविक आहे. यातील प्रत्येक हस्तलिखिताचा इतिहास वेगळा आहे. ती वेगवेगळ्या मार्गांनी वेगवेगळ्या वेळी येथे आली. पण त्या सर्वातून एकच गोष्ट स्पष्ट होते—रशियन लोकांना भारतीय संस्कृतीविषयी वाटणारे औत्सुक्य !

### पहिले मुलतानी हस्तलिखित

पहिली हस्तलिखिते १८ व्या शतकाच्या प्रारंभी इकडे आली. रशियन प्रवाशांनी ती भारतात व युरोपात पैदा केली होती; भारताचा रशियाशी प्रदीर्घकाळ व्यापार होता, त्या भागात काही सापडली, तर काही भारतीय संस्थांनी नजर केलेली होती.












अमा योजनेनुसार उद्योगधंद्यातील भांडवली खर्च दरवर्षी सरासरी सात टक्के व निर्यात व्यापार सव्वा पाच टक्के वाढेल अशी अपेक्षा आहे. दरवर्षी औद्योगिक उत्पन्नातील अपेक्षित वाढ दहा टक्क्याइतकी असून, तेलशुद्धीचे कारखाने, रसायनांचे कारखाने, विद्युत्, रेयॉन इत्यादी प्रकारचे कापड अशा काही क्षेत्रातही वाढ अधिकही असेल.

या योजनेचा मसूदा यापूर्वी जाहीर झालेल्या काही धोरणात्मक निर्णयावर आधारलेला आहे. सरकारी खर्चात दरवर्षी सव्वाचार टक्क्याहून अधिक वाढ न होऊ देणे, सर्वांना मान्य होईल व व्यवहार्य असेल असे भाव व उत्पन्नविषयक धोरण ठेवणे, लष्करी खर्चाला मर्यादा घालणे, आणि परराष्ट्रांना द्यावयाच्या आर्थिक साहाय्याबाबतही आवश्यक संयम ठेवणे हे ते निर्णय होत. योजनेचे एक महत्त्वाचे अंग म्हणजे राष्ट्रीय श्रमशक्तीचा अत्यंत काटकसरीने वापर करणे हे आहे. यामुळे अनेकांना नव्या उद्योगधंद्यात काही माणसे कामास लावावी लागतील; त्याचप्रमाणे आर्थिकदृष्ट्या मागासलेल्या प्रदेशातही हजारो लोकांना कामधंदा मिळेल.

पूर्वीच्या अंदाजानुसार लष्करी खर्च १९६९-७० साली २४० कोटी पौंडापर्यंत वाढेल अशी अपेक्षा होती. तो २०० कोटीपर्यंत मर्यादित ठेवून योजनेच्या यशाची सरकारही जबाबदारी उचलील असे म्हटले जाते. गेल्या काही वर्षात ब्रिटनचे मागासलेल्या राष्ट्रांना होत असलेले साहाय्य दरवर्षी सरासरी दहा टक्क्यांनी वाढत आहे. तथापि या कार्याचे महत्त्व व ब्रिटन त्याबाबतीत करीत असलेले मोलाचे कार्य याची जाणीव असूनही सध्याच्या अडचणीच्या काळात ब्रिटनला त्यावर मर्यादा घालावी लागणार आहे. ब्रिटीश साहाय्य नियोजनपूर्वक देण्यात यावे आणि त्यायोगे परकीय हुंडणावळीचा उपयोग किमान व्हावा अशी दक्षता घेण्यात येईल. राहणीच्या मानातील सुधारणा व लोकसंख्येची वाढ यामुळे अन्नाची गरज वाढणे स्वाभाविक आहे. तथापी गेल्या दहा वर्षात शेतीचे उत्पन्न सुमारे ३४ टक्क्यांनी वाढले आहे. हे उत्पन्न यापुढेही काही निवडक विकासाच्या कार्यक्रमाच्या आधारे वाढविण्यात येईल व त्यायोगाने ही वाढती मागणी पुरी केली जाईल. उत्पादनशक्तीत सतत वाढ करण्याचा प्रयत्न केला जाणार असून त्यायोगे काही क्षेत्रात निर्माण होणारा कामगारांचा तुटवडा भरून काढण्यात येईल.

ही योजना म्हणजे येत्या सहा वर्षातील आर्थिक विकासासाठी एकदाच करून ठेवलेला आराखडा नव्हे. उलट, आर्थिक विकासाचा कार्यक्रम सतत तपासून पाहावयाचा असून त्या दिशेने पडणारे हे पहिले पाऊल होय. पहिली फेरतपासणी एक वर्षानंतर केली जाईल. योजनेनुसार विकासाचे इष्टांक निश्चित करण्यात आले आहेत; कार्यक्षेत्रे स्पष्ट झाली आहेत; आणि प्रयत्नांची दिशाही स्पष्ट झाली आहे. काय काम करणे आवश्यक आहे याचीही एक प्रकारे यादीच आहे; व ती कृती कोणी करायची हेही स्पष्ट झाले आहे. यामुळे योजनेच्या अंमलबजावणीकडे लक्ष देणे सरकारला शक्य होईल.








अनुक्रमणिका